# तांडव आणि लास्य

( लघुनिबंध व लघुकथा संग्रह )

: लेखक :

बालशंकर देशपांडे

: एकमेव विक्रेते :

श्रीसमर्थ बुक डेपो, गिरगांव, मुंबई ४.

मूल्य अडीच रुपये

वेदशास्त्रसंपन्न ग. अं. जोशी,

दे. भ. वं. ना. एकबोटे

आणि

तबलावादनपटु श्री. पु. अं. पिंपरखेडे

या माझ्या प्रेमळ हितचिंतकांस

सप्रेम सादर समर्पण

# आभार

लघुनिबंध क्रमांक नऊमधील महाकाव्य आणि टीका या-संबंधीं विचार प्रकट करतांना मी अनुक्रमें डॉ. वाटवे व डॉ. वाळिंबे यांच्या ग्रथांतील विवेचनाचा आधार घेतला आहे, हें कृतज्ञतापूर्वक नमूद करतों.

लघुनिबंध क्रमांक ७,८,९ व १० सोडून बाकीचे सर्व निबंध व गोष्टी निरनिराळ्या नियतकालिकांत प्रसिद्ध झाल्या आहेत. त्या साहित्यास पुनर्मुद्रणाची परवानगी दिल्याबद्दल मी संपादकांचा आभारी आहे.

श्री. रा. त्र्यं. देशपांडे, प्रोप्रायटर श्रीसमर्थ बुक डेपो मुंबई, यांनीं माझ्या गेल्या पांच पुस्तकांप्रमाणेंच याहि पुस्तकाच्या प्रकाशनाबाबतची सर्व आर्थिक जबाबदारी पत्करून मला उपकृत केलें आहे. श्री. अ. दं. इनामदार व श्री. रा. अं. जोशी, संचालक श्रीशारदा मुद्रणालय, पुणें. श्री. बा. का. अभ्यंकर, मुद्रितेंतपासनीस, श्री. वि. दा. दारवटकर, व मुद्रणालयांतील इतर कामगारवर्ग, श्री. काळे हिंद प्रिंटिंग वर्क्स, मुंबई व चित्रकार मुळगांवकर यांच्या सहकार्यामुळेंच अतिशय थोड्या अवधींत प्रस्तुत पुस्तकाच्या प्रकाशनाचा योग जुळून आला याबद्दल या सर्वांचे मी मनःपूर्वक आभार मानतों.

ज्या सहृदय, रसिक वाचकांच्या सहानुभूतिपर उत्तेजनामुळेंच हें सहावें पुस्तक प्रसिद्ध करण्याची मला सुसंधि लाभली आहे, त्यांना शतशः धन्यवाद !

—लेखक

# अनुक्रमाणिका

## लघुनिबंध



## लघुकथा

# बालशंकर देशपांडे यांचें वाङ्‌मय

## प्रकाशित—

* श्रावणांतल्या विजा ( लघुकथासंग्रह )
* यमुनाजळीं ( लघुकथा व लघुनिबंध ) द्वु. आवृत्ति
( आग्रा विद्यापीठानें बी. ए. च्या अभ्यासक्रमांत समाविष्ट केलेलें )
* माझं जग ( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )
* शोभेचें सौभाग्य ( लघुकथा, लघुनिबंध व टीका )
* शिव्या आणि ओव्या ( लघुनिबंधसंग्रह )
* तांडव आणि लास्य ( लघुनिबंध व लघुकथा )

## —आगामी

* सागराच्या सीमा
* म्हातारा नवरा गमतीला !
* विकत श्राद्ध
* अडला नारायण
* शेरे आणि ताशेरे
* मुद्दे आणि गुद्दे
* टोण्या ( लहान मुलांकरितां )

# एकाच माळेचे : : १

आमच्या गांवांत एक वृद्ध तबलजी आहेत. म्हाताऱ्याच्या हातांत कसब खरं, पण कुणाच्या गाण्याला साथ करायला स्वारी बसली कीं आपल्या वादनकौशल्यानं मैफलीला रंग आणण्याऐवजीं आडीचे ठेके लावून गाणाऱ्याला पदोपदीं बुचकळ्यांत पाडण्यांतच ती स्वतःच्या हुन्नराचं सार्थक मानीत असतें. या गृहस्थाचं स्वतंत्र तबलावादन मीं कैकवेळां ऐकलं आहे अन् प्रत्येक वेळीं त्यानं आत्मसात् केलेल्या कलेवर लुब्ध होऊन मंत्रमुग्ध नागाप्रमाणें घटका घटका डोललों आहे. पण त्याच्या करांगुलींत सामावलेलं हें विलक्षण वादनपटुत्व एखाद्या गायकाच्या सान्निध्यांत प्रकट होतांना त्यात मिसळलेली अहंतेची, आत्मप्रौढीची छटा पाहून माझ्या हृदयाला मनस्वी वेदना झाल्या आहेत. आपल्या छांदिष्टपणानं गाण्याच्या बैठकीचा बदरंग करणाऱ्या त्या वृद्धाकडे पाहून मी मनांतल्या मनांत म्हणतों, ' अरेरे ! बिचाऱ्याचा गुण फुकट गेला ! '

एकदां ग्वाल्हेरकडल्या भागांतले एक उत्तम गवई आमच्या गांवाला आले होते. उमरखेडसारख्या आडवाटेला असलेल्या लहानशा गांवांत चांगल्यापैकीं गाणं ऐकायला मिळणं म्हणजे कपिलाषष्ठीचाच योग म्हणायचा !

पण बुवांच्या साथीला आमच्या गांवचे म्हातारेबुवा बसल्याचं

आढळून आलं तेव्हां कापिलाषष्ठीपेक्षां निराळ्याच 'षष्ठीचा' आज योग आहे, असं मी स्वतःशीं पुटपुटलों.

आणि माझा कयास खोटा ठरला नाहीं. बिहागमधल्या विलंबती चिजेनं बुवांनीं गाण्याला सुरुवात केली होती. धिम्या त्रितालाचा ठेका धरण्याची त्यानीं तबलजींना सूचना केली आणि स्वरविस्तार करण्याकडे स्वतःचं लक्ष केंद्रित केलं. पण बुवा जेमतेम समेवर येतात न येतात तोंच तबलजी महाशयांनीं आपला हातगुण दाखवायला सुरवात केली. दुगुण, तिगण, चौगण अशा वाढत्या क्रमानं त्यांनीं लय वाढवून पर्ण्यांची अन् तोड्यांची अशी कांहीं फैर झाडण्यास सुरवात केली कीं बिचारे बुवा आश्चर्यानं थक्क होऊन वस्तादजींकडे पाहत राहिले! खरं म्हटलं तर बुवांनीं जो ख्याल म्हणायला प्रारंभ केला होता त्यांतला आशय अन् भाव किती हृदयस्पर्शी होता!

'अहाहा! ही बालिका किती प्रगाढ, प्रशांत निद्रासुखाचा अनुभव घेत आहे बरं!' या अर्थाच्या चरणानं त्या चिजेचा आरंभ झाला होता. पण तबलजींनं लावलेल्या धमारसदृश-धमार कसला? त्यांनीं उडवून दिलेली धमाल्च म्हणायची ती!—ठेक्यामुळं कोणता आभास उत्पन्न होऊं पाहत होता? निद्रामग्न बालिकेऐवजीं एखादी खाष्ट म्हाळसाकाकू दुपारच्या जेवणानंतर आडवी होण्याच्या बेतांत असावी तोंच चाळींतल्या उनाड पोरांनीं एकत्र जमा होऊन 'कशी झोंपतेस तें पाहूं!' अशा आव्हानपूर्वक तयारीनं रिकामीं डबडीं बडवण्यास सुरवात करावी—असं चमत्कारिक वातावरण श्रोत्यांच्या कल्पनाचक्षूंपुढें तरळून गेलं असल्यास नवल नाहीं!

ख्यालनंतर 'लंगर धीट मग' ही त्याच रागांतली द्रुत लयींतली चीज बुवांनीं सुरूं केली तेव्हां तर या प्रकारावर कळस चढला. 'यमुनातीराकडे जाणारा आपला नेहमींचा मार्ग कृष्ण अडवून बसला आहे' अशा अर्थाची तक्रार लटक्या रोषानं एक गौळण आपल्या सखीजवळ करीत आहे. तिच्या शब्दाशब्दांत प्रकट होणारा रोष अन् लाडिकपणा

याचं हृदयंगम मिश्रण ज्या ढंगदार लयकारीनं अन् स्वरविलासानं बुवा श्रोतृगणाच्या अनुभवास आणून देत होते त्याला किती समजदार साथीची आवश्यकता होती ! तबल्यावर उमटणाऱ्या प्रत्येक बोलांतून गौळणीचा रोष, प्रीति इत्यादि भाव ध्वनित व्हावयास हवें होतें. पण म्हाताऱ्यानं विषम मात्रांचा कुठलासा अनवट बोल लावून कुडबुड्या ज्योतिष्याच्या वाद्याची रसिकांना आठवण करून दिली आणि त्यांच्या वृत्तीवर चढूं पाहणारी संगीताची नशा पार नाहींशी करून टाकली !

पण त्या वृद्ध तबलजीच्या जातीची हटवादीं माणसं कोणत्या क्षेत्रांत नाहींत ? स्वतःच्या गुणवैशिष्ट्याचं प्रदर्शन करण्याच्या हव्यासापुढं मजलशीच्या रंगाची तमा न बाळगणाऱ्या त्या वृद्धाला दोषी ठरवायचं, तर मग या विराट जीवनसंगीताशीं तादात्म्य न पावून आपल्याच व्यक्तिमत्त्वाची टिमकी वाजविणाऱ्या अन् विश्वाच्या या भव्य मैफलीचा विरस करणाऱ्या महाभागांना कोणत्या न्यायानं निरपराध समजायचं ?

शब्दचमत्कृति, कल्पनाविलास, अलंकार, यांचं अवास्तव स्तोम माजवून जीवनानुनयाचा अंतिम हेतु डावलणाऱ्या साहित्यिकांच्या लेखण्या जीवनसंगीताच्या साधनेचा थोडा थोडका का विचका करीत आहेत ?

समाजसेवेचं अनुसंधान न राखतां प्रतिष्ठा नि हुकमत यांच्याच प्रलोभनामागं वाहवत जाणाऱ्या पुढाऱ्यांनींहि राजकारणाची ‘ बैठक ’ बिघडवून टाकली नाहीं का ?

विश्वधारणेचं महान् ध्येय दृष्टिआड करून क्षणजीवी रूपसंपदेच्या उन्मादांत स्वैरवर्तन करणाऱ्या सौंदर्यसंपन्न प्रमदा, उपकारधर्माचा विसर पडून भोगपूर्तीच्या ध्यासानं वेडावलेले लक्ष्मीपुत्र, प्रमत्तांचं निर्दालन नि पीडितांचं उद्धरण हें शासनसंस्थेचं ब्रीद नाकारून दीन दुबळ्यांचा छळवाद मांडणारे सत्ताधीश ...हे सारे प्राणी म्हणजे जगताच्या या भव्य महालांत आळविल्या जाणाऱ्या संसृतीच्या सुरावटीशीं लय न पावतां आपल्याच तालांत वागणारे स्वेच्छाचारी साथीदारच नव्हेत का ? लोको-

त्तर गुणांची देणगी लाभलेल्या व्यक्तींचीं हीं उदाहरणं सोडून दिलीं तरी सर्वसामान्य माणसांच्या बाबतींत तरी जीवितकार्याशीं तद्रूपता झालेली कुठं दृष्टीस पडते ? जीवनध्येयाची तन्मयतेनं साथ करण्याचं टाळून जो तो आपल्याच छंदानं वर्तन करण्यात आनंद मानीत असलेला आढळून येत आहे !

माझ्या या विधानांतलं सत्य पडताळून पहायचं असेल तर डॉक्टर, वकील, शिक्षक, कारकून, या बुद्धिजीवी अथवा कोणत्याहि श्रमजीवी कामगारांच्या जीवननिष्ठा तपासून पहा !

अडलेल्या बाळंतणीच्या नवऱ्याशीं फीबद्दल हुज्जत घालीत बसलेला डॉक्टर, जीविताला कंटाळलेल्या अशीलाला आत्महत्येचा सल्ला देऊन त्याबद्दल फी आकारणारा वकील, परीक्षेच्या आधीं शिष्यवराच्या कानांत प्रश्नपत्रिका फुंकणाऱ्या गुरुमाऊली, अंत्यविधीपूर्वी मयत इसमाचा दाखला मागायला गेल्यावर त्याबद्दल लांच न मिळाल्यामुळं सदरहु ‘ केस ’ पेंडिंगमध्यें ठेवण्याची धमकी देणारा म्युनिसिपालिटीचा कारकून हे बुद्धिनिष्ठ जीव काय किंवा दर दोन दिवसांआड महागाईभत्त्यासाठीं संप करून समाजगतींत अडथळे आणूं पाहाणारा श्रमजीवी वर्ग काय सारेच ‘ आडीचा ठेका ’ लावून संगीताचा विचका करणाऱ्या त्या वृद्धाच्या माळेचे मणी वाटतात मला !!

प्रसिद्धी—दीपज्योति, फेब्रुवारी १९५०

# कपबशींतलं ब्रह्म ! : : २

परमेश्वराप्रमाणंच कपबशाहि 'एकोऽहं बहुस्याम' अशी प्रतिज्ञा करूनच जन्माला येत असतात कीं काय कुणास ठाऊक ? नव्या डिझाईनच्या कपबशीचा जोड दिसला कीं, मोठ्या हौसेनं तो खरेदी करून मीं घरीं आणावा अन् चार पांच दिवसांतच त्याचे 'दशावतार' झालेले दृष्टीस पडावेत असं गेल्या दीड महिन्यांत चार वेळां घडलं होतं ! देशस्थ माणूस एक वेळ चिनी मुलीबरोबर संसार करूं शकेल. पण चिनी मातीच्या भांड्याशीं त्याचं चार घटकासुद्धां सूत जमायचं नाहीं, या माझ्या एका कोंकणस्थ मित्राच्या विनोदांतली गर्भित टीका मला अमान्य करायची नाहीं. पण कोंकणस्थ काय किंवा आणखी कोणी काय, घरांत पाळणा हलत नाहीं तोंपर्यंतच त्याचें व्यवस्थितपणाचं व्रत निर्वेधपणें चालूं शकतं, हा अनुभवहि दृष्टीआड करून चालणार नाहीं ! बालकाला संसारवेलीवरली चिमुकली कळी मानणाऱ्या कवीशीं माझा फारसा मतभेद नाहीं. तथापि कांचेच्या किंवा चिनी मातीच्या वस्तु दृष्टीस पडल्या रे पडल्या कीं त्याच कळीचं कर्लींत रूपांतर झालेलं मी कितीतरी वेळां पाहिलं आहे !

आमच्या दिलीपला नुकतंच कुठं दुसरं संपून तिसरं वर्ष लागलं होतं. पण कपबशीचा जोड तावडींत सांपडतांच एखाद्या आधिभौतिक-वाद्याच्या भूमिकेवरून एकांत अनेकत्व शोधण्याचा या स्वारीचा खटाटोप

सुरू होतो अन् मग जडवादानं जगाला आलेल्या अवकळेप्रमाणं हां हां म्हणतां आमच्या गृहस्थाश्रमाला केविलवाणी अवस्था प्राप्त होते! पितळी वाटीनं नाहीं, तर प्याल्यानं चहा पिण्याचा अन् पाजण्याचा प्रसंग केविलवाणाच नाहीं तर काय म्हणायचा! पण हा 'आपद्धर्म' दोन दिवसांच्यावर कांहीं टिकत नाहीं. आमच्या स्वयंपाकघरांत पितळी भांड्यांतून चहा पितांना बसणाऱ्या चटक्यामुळं म्हणा अथवा चिनीमातीच्या कपबशींतून चहा पिण्याची चटक बलवत्तर म्हणून म्हणा, मी तिसऱ्याच दिवशीं नव्या कपबशा खरीदण्याच्या उद्देशानं घराबाहेर पाऊल टाकतों! माझ्या या उधळपट्टीचा परामर्ष घेणारे अनेक टीकाकार मला भेटले आहेत. मनुष्याच्या मनांतून युद्धप्रवृत्तीचं निमूलन होईपर्यंत कपबशांचा शोक करणं म्हणजे निव्वळ महामूर्खपणा होय, या अर्थशास्त्राच्या दृष्टिकोनांतून दिलेल्या शेऱ्यापासून तों कपांतून चहा पिणं म्हणजे शुद्ध भ्रष्टपणा आहे, या अध्यात्माच्या उच्चासनावरून झाडलेल्या ताशेऱ्यापर्यंत टीकेचे विविध नमुने मला पहायला मिळाले. पण त्यांपैकीं एकाकडेहि मी फारसं लक्ष दिलं नाहीं. रबरी टायर पंक्चर होऊन निकामी बनण्याचा संभव असतो म्हणून मोटारीला लोखंडी धावाच बऱ्या असं म्हणण्यापैकींच वरील महाभागांचा अभिप्राय म्हणायचा! पत्नीसाठीं फुलांच्या वेणीपायीं दररोज चार दोन आणे खर्च करीत बसण्यापेक्षां एकदांच सोन्याचं गुलाबाचं फूल खरेदी केलं तर ऐटच्याऐट नि बचतहि करतां आल्याचं समाधान मानणारे कांहीं हिशेबी आत्मे पृथ्वीतलावर आहेतच कीं! परमेश्वराला हा हिशेब सुचत नाहीं म्हणून बरं! नाहीं तर नक्राच्या दाढेंत पाय सांपडल्यावर भक्तिभावानं कमळ वाहणाऱ्या गजेंद्राला श्रीविष्णूनं म्हटलं असतं, कमळ घेऊन काय करूं बाबा मी? दोन दिवसांतच तें कोमेजून जाईल, त्यापेक्षां तुझा दांतच उपटून देत असलास तर पहा! म्हणजे लक्ष्मीसाठीं त्याचा शानदार कंगवा तरी बनवितां येईल!

कोणत्याही वस्तूची योग्यता तिच्या आयुर्मर्यादेवरून ठरविणं मला साफ नामंजूर आहे !

सकाळच्या रम्य प्रहरीं, सोनेरी वेलबुट्टी काढलेल्या पांढऱ्याशुभ्र कपबशींतून चहाचा एकेक घोट प्राशन करतांना जी कांहीं लज्जत अनुभवायला मिळते ती स्टेनलेसच्याच काय पण चांदीच्यासुद्धां पात्रांतून पितांना अनुभवतां यायची नाहीं अशी माझी वालंबाल खात्री आहे !

' With all thy faults, I love thee !' असं कोणत्याशा प्रियकरानं आपल्या प्रेयसीसंबंधानं म्हटलंय ना ? कपबशीच्या भंगूरतेचा विचार करतांना नेमकी हीच काव्यपंक्ति माझ्या मनांत घोळूं लागते !

अशाश्वत, अनित्य जीवनावर प्रेम करतांनाहि याच वृत्तीचा मला अंगिकार करावासा वाटतों. मानवी जीविताच्या नश्वरतेवर निर्भत्सनेचं तीक्ष्ण हत्यार चालविणाऱ्या ऋषिमुनींचीं नि संतपंत कवींचीं वचनं जमेस धरून मी हें विधान करीत आहे ! मेलेल्याइतकंच मरणार असलेल्यालाहि मारणं गर्ह्य आहे हें प्राचीन पंडितांना उमगलं नसेल असं नाहीं. पण जडांतील चेतन, व्यक्तींतील अव्यक्त, नाशवंतांतील अक्षरतत्त्वाचं समाधान न पावून कोणत्याहि पार्थिव साधनेच्या सहाय्यावांचून चिरंतनाचा, चिन्मयतेचा साक्षात्कार अनुभवण्याचा त्यांना ध्यास लागला असावा अन् म्हणूनच देहाच्या आगंतुक उपाधीचा अडथळा असह्य होऊन त्यांनीं त्या बिचाऱ्यावर प्रखर हल्ले चढविले असावेत ! माझी ही उपपत्ति सर्वस्वीं बरोबर असेलच असं मी म्हणत नाहीं. पण माझ्यासारख्या सामान्य माणसाला विश्वाच्या या स्थूल, क्षणजीवि विस्तारांतच सत्य, शिव अन् सौंदर्य प्रतीत होण्याची शक्यता वाटतें.

विद्युल्लतेचा तेजोविलास, उल्केची दीप्ति, इंद्रधनूची रंगसंगति, सिंधुलहरींचं लास्य, पुष्पांचा परिमल, रमणींचे भ्रूभंग, बालकांचं हास्य हीं

सारीं अल्पजीवी खरीं, पण त्यांच्या कणाकणांतून परमात्म्याच्या चिच्छक्तीची, सौंदर्याची अनंत प्रस्फुरणं पाहत असल्याचा मला जेव्हां दिव्य भास होतो त्याच क्षणीं जीवनाविषयीं विलक्षण ओढ वाटूं लागते. मग ती मला कपबशीबद्दल वाटणाऱ्या आकर्षणांतून जाणवो नाहीं तर आणखी कशाच्याहि !

प्रसिद्धी—सुषमा, जानेवारी १९५०

## धर्मराजाचा रथ : : ३

डॉक्टर एका पहिलटकरणीला बालकाच्या शुश्रुषेविषयीं सूचना देत होते. ते म्हणाले, 'तापलेल्या दुधांत थंड पाणी घालून तें दोन दोन तासांनीं मुलाला द्यायचं, नंतर...'

पण पुढें त्यांना बोलूं न देतां ती स्त्री मध्येंच म्हणाली, 'इश्य! दुधांत पाणी घालायला काय झालं? आमच्या घरीं दुभत्याला कांहीं कमी नाहीं हो डॉक्टर! चांगल्या दोन म्हशी व्याल्या आहेत ना याच महिन्यांत, अन् गाय पण पुढच्याच महिन्यांत--'

मातृपदाच्या महतीविषयीं शक्य तेवढी आदराची भावना बाळगूनहि डॉक्टरला त्या स्त्रीच्या भाबडेपणाचं हंसूं आल्यावांचून राहिलं नाहीं. 'मूर्ख स्त्रीला सल्ला देण्याचा प्रसंग नशीबीं लिहूं नकोस' अशी त्रिवार परमेश्वराची प्रार्थना करणारं दुसरं एखादं सुभाषित जन्माला आलं कीं काय हें मला ठाऊक नाहीं; पण अरसिकाला कविता वाचून दाखविण्याच्या दुर्दैवी घटनेपेक्षांहि असमंजस मनुष्याला आरोग्यविषयक सूचना देण्याची आपत्ति दुर्धर आहे अशी त्या वेळीं माझ्या मनांत कल्पना येऊन गेली.

मोठेपणाचं प्रदर्शन करण्याच्या हव्यासांत निर्बुद्धपणाचाच प्रत्यय

आणून देणाऱ्या श्रीमंत माणसाच्या स्वभावाचा तो नमुना या दिवशीं दुसऱ्यांदां मला पहावयास सांपडला होता.

आमच्या चाळींतल्या एका श्रीमंत सिंधी इसमानं आपल्या नूतन-परिणीत प्रियेसाठीं मोठ्या हौसेनं इयरिंग्ज खरेदी करून आणले होते. कसा कुणास ठाऊक, त्या कर्णभूषणासाठीं वापरलेलं सोनं शंभर नंबरी नसून त्यांत तांब्याची किंचित् भेसळ केल्याचा तिला शोध लागला. हिणकस सोन्याचा दागिना घालायला आपणाला भीक लागली नाहीं अशा अभिप्रायाचा फणकाऱ्यानं उद्गार काढून तिनं कानांतलीं भूषणं काढून आपल्या पतिराजांसमोर भिरकावून दिलीं. पण अस्सल सोन्यांत हीण मिसळल्याशिवाय दागिन्याला कडकपणा येणं शक्य नसतं, ही वस्तुस्थिति तिच्या नवऱ्यानं समजावून सांगितली तेव्हांच कुठं त्या कलहांतरितेचा रोष नाहींसा झाला.

दुधांत पाणी मिसळून तें मुलाला पाजण्यांत कमीपणा मानणारी दवाखान्यांतली स्त्री काय किंवा ताम्रमिश्रित सुवर्णालंकार वापरण्यांत इभ्रतीला बट्टा असल्याचा समज करून घेणारी आमच्या चाळींतली सिंधी स्त्री काय, यांच्या स्वभावांतला अविचारीपणा आपल्या ठिकाणीं-सुद्धां प्रकट झालेला पहायला मिळतो कीं ! ग्रंथांतलीं नीतितत्त्वं जशींच्या तशीं प्रत्यक्षांत आचरून दाखवण्याचा अट्टाहास असल्या अविवेकावरच आधरलेला नाहीं तर काय ! या नीतितत्त्वांचं कांटेकोर-पणानं: आचरण करण्याच्या भरांत पदरीं किती हास्यास्पदता येते हें सूचित करणारा एक गमतीचा चुटका नुकताच माझ्या वाचनांत आला. दोन शाळकरी मित्र एका अरुंद बोळांतून जात होते. बोळाच्या तोंडाशींच एक मारकी म्हैस शिंगें रोखून उभी असलेली त्यांच्या दृष्टीस पडली. प्रथम दोघेंहि भ्याले. पण त्यांच्यापैकीं एकजण धीटपणाचा आव आणून म्हणाला, 'हे पहा, या म्हशीपुढून एकेक पाऊल टाकीत ऐटीनं निघून जाऊं आपण. तिला आपण भ्यालों आहोंत असं मुळींच दाखवूं नये!'

यावर त्याच्या सोबत्यानं उत्तर दिलं, ' तें खरं रे ! पण अशानं आपण मुक्या प्राण्याला फसवल्यासारखं होणार नाहीं का ? '

सत्याची इतकी अव्यवहार्य कांस धरणाऱ्या त्या मुलाशीं नातं सांगतां येईल असे कितीतरी स्त्री–पुरुष मला नित्य आढळून येतात. ग्रंथ-निर्दिष्ट तत्त्वं जशींच्या तशीं आचरून दाखविण्याच्या खटाटोपांत स्वतःचं हसं होत असल्याचा अनुभव येऊनहि हे नीतिपरायण आपल्या तत्त्वनिष्ठेला चिकटून राहिलेले पाहिलें कीं, यांच्या ध्येयवादाचं कौतुक करावं कीं त्यांच्या मुळाशीं दडलेल्या अप्रासंगिकपणाला हंसावं हेंच कळत नाहीं ! दया, क्षमा, शांति, सत्य, अहिंसा इत्यादि नीतितत्त्वांना जीवनांत स्थान नसावं असं मला मुळींच म्हणायचं नाहीं. किंबहुना या तत्त्वांच्या अभावी मानवी जीवित रुक्ष, नीरस अन् भयाण झालं असतं याचीहि मला पूर्णपणें जाणीव आहे. पण हें सत्य मान्य करूनहि सर्वसामान्य मनुष्याला दया–क्षमादि तत्त्वांना थोडी तरी मुरड घातल्याशिवाय, त्यांचा थोड्याफार तरी प्रमाणांत संक्षेप केल्याशिवाय तीं व्यवहारांत आचरून दाखविणं वाटतं तितकं सोपं नाहीं.——नव्हे, अशक्यप्राय आहे असं माझं स्पष्ट मत आहे. मिथ्या भाषणाचा जिभेला चुकूनहि स्पर्श न होऊं देणाऱ्या धर्मराजानं एका प्रसंगीं असत्य वाणी उच्चारतांच त्याचा अधांत्रीं चालणारा रथ जमिनीवरून चालूं लागला अशी आख्यायिका आहे. सत्याची तरफदारी करण्यासाठीं या आख्यायिकेचा जन्म झाला अशी श्रद्धा बाळगणारे बाळगोत बिचारे ! पण मला या कथेंत निराळ्याच रहस्याचा आढळ होतो. मानवी शक्तीची मर्यादा फार कौशल्यानं प्रस्तुत प्रसंगाच्याद्वारें सूचित केली आहे. असं मला वाटतं ! संपूर्ण सत्याच्या परिपालनाचे मनोरथ कविकल्पनेप्रमाणं जमिनी-ऐवजीं अंतराळांतूनच धांवत नाहींत तर काय ? त्या सत्यांत असत्याची थोडी तरी भेसळ ज्या क्षणीं मनुष्याला करतां येईल त्या क्षणीं त्याच्या मनोरथाचीं चक्रं व्यवहाराच्या भूमीला टेकलीं असंच वस्तुतः म्हणायला हवं ! धर्मराजाच्या तोंडून अनृतवाणी बाहेर पडली त्याच

घटकेला तो स्वप्नरंजनांतून वास्तवतेच्या भूमीवर उतरला असं मानायला कोणती हरकत आहे ? धर्मराजाप्रमाणंच ज्यांनीं व्यवहारसौकर्यासाठीं नीतिनियमांत थोडाबहुत बदल करून समयज्ञता दाखविली अशा कितीतरी व्यक्ती आपल्या जुन्या इतिहासपुराणांतून काढून दाखवितां येतील. क्षुधाशमनासाठीं मृत श्वानाचं मांस भक्षण करून कर्मठपणाला मर्यादा घालणारे मुनिवर्य विश्वावित्र, भेदनीतीच्या आश्रयानं वालीचा वध करून सत्य–अहिंसेच्या व्रताला जीवनाभिमुख बनविणारे प्रभु रामचंद्र, अन्यायाचा प्रतिकार न करतां स्वस्थ बसणाऱ्या पतिदेवांची कठोर वाक्‌ताडनानं निर्भत्सना करून पतिव्रताधर्माला वास्तवतेचा उजळा देणारी द्रौपदी, तृषार्त गर्दभाच्या तोंडांत काशीची कावड रिचवून परमार्थाला ऐहिकतेच्या सेवेला जुंपणारे एकनाथमहाराज, किंवा तीग्मतीक्ष्ण वाग्बाणांनीं दांभिकांचा मर्मभेद करून साधुता ही सापवाद असल्याचें सिद्ध करणारे शांतिब्रह्म तुकोबाराय ह्या साऱ्या विभूतिश्रेष्ठांचे आचार माझ्या या विधानालाच पुष्टि देत नाहींत काय ?

'मनुष्यासाठीं नियम' या तत्त्वाच्या अगदीं उलट आचरण करून 'नियमासाठीं मानव' असल्याचं सिद्ध करून दाखविण्याचा खटाटोप करणाऱ्या व्यक्ती इतिहास-पुराणांत नाहींत असं नाहीं. पण त्यांच्या व्यक्तिरेखा चित्रिणाऱ्याचं नातं सत्यान्वेषी इतिहासकारापेक्षां श्रद्धाळु भक्त आणि स्वप्नाळु कवि यांच्याशींच अधिक जुळणारं आहे, यांत बिलकूल शंका वाटत नाहीं.

'मर्चंट ऑफ व्हेनिस' या नाटकांत शेक्सपीअरनं एका पात्राच्या द्वारें हेंच तत्त्वज्ञान मोठ्या प्रभावीपणानं विशद केलं आहे. एखाद्या गुन्हेगाराच्या अपकृत्याबद्दल त्याला शिक्षा करतांना केवळ निर्जीव, ठोकळेबाज कायदेशास्त्रांतील कलमांचा आधार न घेतां सहानुभूति, दया इत्यादि मानवी प्रेरणांचाहि मागोवा घ्यावा असं तें पात्र जीव तोडून सांगत असतं !

मुलाला दूध देतांना तें पाण्यांत मिसळून द्यायला हवं असं डॉक्टर-मुद्धां मनापासूनच म्हणाले होते कीं ! पण, 'इश्श ! आमच्या घरीं दुभत्याला कांहीं कमी नाहीं हो डॉक्टर, चांगल्या दोन म्हशी व्यायल्या आहेत,' असं ठमक्यांत उत्तर देणाऱ्याची समजूत काढायला कुणाची माय व्याली आहे ?

प्रसिद्धी—हंस, आक्टोबर १९४९

# मुलखावेगळं मन : : ४

साहसपूर्ण प्रसंगांनीं भरलेला जंगल—चित्रपट लहान मुलं अन् कुत्रीं यांना पाहूं देत नाहींत. शहरी सुधारणेचा वारा न लागलेल्या आमच्या गांवच्या पंचक्रोशींत स्त्री-पुरुषांनासुद्धां कुठलेंहि नाटक अगर बोलपट दाखविण्याची सोय नसते! सोय हा शब्द साधन या अर्थानं मी वापरीत नाहीं, घडगत या अर्थानं!

लंकादहन नाटक चालू असतां रावणाच्या विषयलोलुपतेची चीड येऊन त्याच्या तोंडावरलीं पुठ्ठयाची दहा तोंडं सर्वांसमक्ष खसकन् ओढून बाजूला सारणारा नीतिपरायण प्रेक्षक किंवा विमानांत बसून सदेह स्वर्गारोहण करण्याच्या तयारींत असलेल्या तुकारामबोवांच्या पायाला घट्ट मिठी मारून स्वतःच्याहि उद्धाराची गळ घालणारा अन् दिडाच्या आंत नाटक आटपायच्या कायद्याला बाध आणणारा मुमुक्षु, यांच्यासमोर नाट्यप्रयोग करून दाखविणं म्हणजे दिव्यच नाहीं तर काय!

सुधाकराच्या गुन्ह्यावर पांघरूण घालण्याचा प्रयत्न करीत असतां मध्येंच पिटांतून उठून, ' नाहीं हो फौजदारसाहेब ! या बदमाषानंच तिला अन् मुलाला मारलं ! ' अशी तिच्याविरुद्ध साक्ष देणारा केवारी आमच्या वऱ्हाडांत आढळून आला नाहीं तरच नवल! प्रभु रामचंद्राच्या वेषांतील पात्र्यांच्या पायापाशीं मोठमोठ्या अवजड शिळा आणून त्यांच्यांतून अहिल्या-

मद्दश सुंदर गायकांची निर्मिति करण्याचा आग्रह धरणारे त्रस्त नवरेहि आमच्या आढळांत आले आहेत अशी उद्यां एखाद्या नाटककंपनीच्या मॅनेजरनं आठवण प्रसिद्ध केली तर मी खुशाल डोळे मिटून तिच्यावर विश्वास ठेवीन!

नाटक चालू असतांना नाट्यवस्तूशीं समरस होण्याच्या बाबतींत प्रेक्षकानं तारतम्य राखलं नाहीं म्हणजे त्याच्या हातून किती हास्यास्पद चुका घडतील हें कोण सांगू शकेल? रंगभूमीवर घडत असलेले प्रसंग खरे नव्हेत, आभासरूप आहेत ही जाणीव मनांत निरंतर ठेवून त्यांच्याशीं संयमानं तादात्म्य पावणाऱ्या रसिक प्रेक्षकालाच नाट्यकृतीचं खरंखुरं मर्म कळू शकतं. कोणत्याहि कलाकृतीच्या रसग्रहणासाठीं आवश्यक असलेल्या या मनोवृत्तीलाच साहित्यशास्त्रकारांनीं ‘ स्वायत्त तादात्म्य ’ किंवा ‘ सविकल्प समाधि ’ अशा संज्ञा दिल्या आहेत. नाटकांतील प्रसंगाशीं वा पात्राशीं अगदींच ताटस्थ्य, दूरत्व राखणाऱ्या ‘ मुक्ताला ’ त्यांतील आनंदाची प्रचीति येणं जितकं अशक्य तितकंच स्वतःला विसरून त्यांच्याशी संपूर्णपणें तद्रूप पावणाऱ्या हळव्या प्रेक्षकांनाहि रसास्वादाचं अलौकिक सुख मिळणं कठीण आहे.

जग ही सुद्धां एक विशाल रंगभूमीच आहे, हा शेक्सपीयरसारख्या कविजनांचा अभिप्राय मान्य करतांना, जीवननाट्यापासून लाभणाऱ्या आनंदाच्या मुळाशींहि सविकल्प समाधीची उपपत्ति गृहित धरावयास नको का?

कमलदलावरील जलबिंदूच्या अलिप्तपणानं मनुष्यानं संसारांतील भोग भोगावयास हवेत असा भगवंतांनीं अर्जुनाला उपदेश केला त्यांतहि हेंच रहस्य नाहीं का?

पण गंमत ही कीं, खेडवळ प्रेक्षकांना हंसणारे तुम्ही आम्ही जगांत वावरतांना मात्र नेमका हाच सिद्धान्त विसरून जात असतों आणि जीवित-

नाटकांतील प्रत्येक घटनेशीं, प्रत्येक घटकाशीं संपूर्णतया समरस पावून त्यांतील दिव्यानंदाच्या साक्षात्काराला मुकतों !

परीक्षेंत अपयश आलं, हातांत बडतर्फीचा हुकूम पडला, कुळानं कर्ज बुडविलं किंवा कोर्टानं मनाविरुद्ध निकाल दिला म्हणजे आमच्या विषादाला सीमा राहत नाहीं. तेंच, अनासक्तीची शिकवण रोमारोमांत मुरलेल्या लोकमान्य टिळकांचं उदाहरण पहावं ! मुलाच्या देहावसनाची तार तशीच हातांत ठेऊन मनाला यत्किंचित्‌हि विचलित न होऊं देतां निर्लेप, निर्विकार वृत्तीनं त्या महाभागानं केसरीच्या अग्रलेखाचं निवेदन चालूं ठेवलं होतं ! याच पुण्यश्लोकाला पाशवी सत्तेनं सहा वर्षं सश्रम कारावासाची शिक्षा सुनाविली तेव्हां उभा भारतवर्ष धाई धाई रडला, पण त्या रात्रीं या पुरुषोत्तमाला मात्र अंधारकोठडींतील कृमिकीटकांनीं बुजबुजलेल्या भूशय्येवर गाढ निद्रा लागली होती !

अनेक नियतकालिकांनीं प्रशंसिलेल्या माझ्या एका पुस्तकावर एका मासिकाच्या संपादकांनीं मात्र प्रतिकूल टीका लिहितांच माझ्या अस्मितेला केवढा तरी धक्का बसला. आग्रा विद्यापीठाच्या बी. ए. च्या अभ्यासक्रमांत समाविष्ट झालेल्या माझ्या पुस्तकावर प्रतिकूल परीक्षण प्रसिद्ध व्हावं म्हणजे काय ? झालं ! दोन दिवस त्या टीकेमुळं मी अगदीं बेचैन झालों होतों. पण ग्रंथकर्तृत्वाविषयीं " तऱ्ही पुरोहितगुणें । मी बोलिलों पुरें उणे । तें तुम्ही माउलीपणें । उपसाहिजे जी ॥ " हे ज्ञानेश्वरांचे शालीन उद्गार आठवले तेव्हां माझ्या अहंतेची मला लाज वाटूं लागली. ' शब्द कैसा घडिजे । प्रेमयीं कैसे पां चढिजे । अलंकार म्हणजे । काय तें नेणे ॥ ' या ओंवींत प्रकट झालेली त्यांची लीनता पाहून तर मी स्तिमितच झालों ! वस्तुतः ज्ञानेश्वरांच्या ओंवीनंतर ओंवीरचना करूं पाहणं म्हणजे अमृताच्या ताटांत नरोटी ठेवण्याचं अनुचित साहस करण्यासारखं आहे असा ज्यांच्या प्रतिभेचा गौरव एकनाथासारख्या व्युत्पन्न कवीनं केला आहे, त्या कवी-श्वराच्या तोंडून स्वतःबद्दल केवढया आढयतेचे उद्गार निघायला हवे

होते ? पण स्वकाव्यनिर्मितिविषयींच्या निर्मम वृत्तीनंच त्यांचा मनःप्रसाद समतोलपणा ढळूं दिला नाहीं ना ?

नाहीं तर, ' अशी रचाया दुजी कुणाची माय व्यालि भूवरी ' किंवा, ' अशि कोण वर्णि सदलिका । इतर कवि कविरायाहुनि फिका ' ही रामजोशाची गर्वोक्ति पहावी ! भाषाकामिनीला नटवून, सजवून नर्तन करायला लावण्याचं अजब कसब या लावणीकाराला साधलं होतं अशी कबुली देऊनहि त्याचा हा अहंकार मनाला खटकल्यावांचून राहत नाहीं !

यशःप्राप्तीनं बुद्धीला येणाऱ्या उन्मादाशीं निरवधानपणें तदाकार झाल्यामुळंच जोशीबोवांचं पाऊल या ठिकाणीं घसरलं ना ?

१९४७ सालीं पहिल्या स्वातंत्र्यदिनाच्या निमित्तानं अलम् हिंदुस्थान आनंदानं बेहोष झाला होता. मुंबापुरी तर एखाद्या इष्कबाजाबरोबर मादक पेयाचे चषकामागून चषक फस्त करण्यांत मश्गूल झालेल्या मस्तवाल, नखरेल वारयोषितेप्रमाणं उल्लू बनली होती ! नृत्य, गायन, मद्यपान इत्यादि विलासांचे सारे रंगढंग, सारे सोहाळे, सारीं चेष्टितें यांना ऊत आला होता नुसता ! अशा मत्त क्षणीं उभ्या देशांत एकाच काय त्या व्यक्तीनं आपलं भान हरपूं दिलं नव्हतं, वृत्ति बेताल होऊं दिल्या नव्हत्या ! स्वातंत्र्याची नशा, दास्यमुक्ततेचा उन्माद, मोक्षाचा कैफ मनावर न चढण्याला त्या व्यक्तीला स्वतंत्रतेची किंमत कळत नव्हती का ? विमोचनाची महति पटली नव्हती का ? परवशतेचा जाच असह्य होत नव्हता का ? छेः छेः हिंदी स्वातंत्र्याचा विधाता म्हणूनच तर तिला भावी इतिहासकार ओळखणार आहेत ! महात्मा गांधी हे भारताच्या स्वातंत्र्याचे जनक नव्हत तर काय ? पण या स्वातंत्र्याचा क्षण देशांत उगवला तेव्हां महात्माजी तुम्हा आम्हांप्रमाणं मिष्टान्नसेवनांत गर्क झाले नव्हते, नाच तमाशे पाहण्यांत रंगले नव्हते, घराघरावर झगमगणाऱ्या विद्युत्‌दीपांची रोषणाई न्याहाळण्यांतहि गढले नव्हते ! नौखालीच्या हत्याकांडानं शोकविव्हल झालेल्या असहाय्य देशबांधवांचे अश्रु पुसण्यासाठीं ते बंगालमध्यें गेले होते. वैयक्तिक वा सामुदायिक

मुखदु:खांशीं सर्वस्वी लिंपित न होण्याची सावधगिरी महात्माजींना घेतां आली म्हणूनच जीवनानुभूतीचा उत्कट आनंद, प्रसन्न हास्य सदासर्वदा त्यांच्या मुखावर विलसलेलं आपणाला पहायला मिळालं. गडकऱ्यांनीं कुठंसं म्हटल्याप्रमाणं ‘ जगाच्या रंगानं रंगल्याखेरीज ’ ते जगांत अखेर घटकेपर्यंत वावरूं शकले !

भरतापासून तों शिवरायापर्यंत, प्राचीन आदर्श पुरुषांच्या परंपरेंतील प्रत्येक नररत्नानं हीच जीवनदृष्टि अंगीं बाणविण्याचा प्रयत्न केला होता अशी इतिहास-पुराणं ग्वाही देतात. एकापेक्षां अनेक अर्थांनीं खरं असलेलं हें ‘ मुलखावेगळं ’ मन ज्यांना लाभलं नाहीं अशा व्यक्तींवर अप्रबुद्ध प्रेक्षकांप्रमाणं कसे फटफजितीचे प्रसंग ओढवले हेंहि इतिहास-पुराणांनीं स्पष्ट सांगितलं आहे. ययाति, रावण, अग्निवर्ण, दुःशासन, शिशुपालादि पुराणकालीन नि संभाजी, राघोबादादा, दुसरा बाजीराव, उदयभानु, मानसिंग इत्यादि इतिहासकालीन व्यक्तींनीं विश्वनाट्याकडे चुकीच्या दृष्टिकोनांतून पाहिलं म्हणूनच त्यांना त्यांतील उत्कट रसाचा प्रत्यय येऊं शकला नाहीं, हें उघड आहे. काम, क्रोध, मद, मत्सर इत्यादि मूलभूत मानवी प्रवृत्तीच्या आहारीं सर्वस्वी न जातां किंचित् दूरत्वानं त्या त्या भावविलासाकडे पाहिलं असतं तर त्यांना त्यांतील अविट माधुर्याची चव सहज समजली असती !

आतां सांगा, विद्येचे, शास्त्राचे संस्कार झालेल्या या सुबुद्ध म्हणविणाऱ्या व्यक्तींच्या प्रमादांना हंसावं कीं रामाच्या प्रवेशाची वाट न पाहतां स्वतःच रावणाचा निःपात करायला रंगभूमीवर धांऊन जाणाऱ्या आमच्या वऱ्हाडांतल्या भोळसर प्रेक्षकांना !

प्रसिद्धी—हिंद, दिवाळी अंक १९४९

## आंबराई : : ६

निरनिराळ्या कालखंडांना वैशिष्ट्यनिदर्शक असं एकेक नांव मिळालेलं आपण ऐकतों. उदाहरणार्थ, तमोयुग, अश्मयुग. लोहयुग, इत्यादि. पण हल्लींच्या युगविशेषाला एकचएक नांव देतां येणं कठीण आहे! फॅशनपासून तों अॅटम्बॉम्बपर्यंत आणि लघुकथेपासून तों उपहारगृहापर्यंत अनेक गोष्टींवरून आजच्या युगाचं स्वरूप ठरविण्याचा आपण प्रयत्न करीत आहोंत. व्यक्तिस्वातंत्र्याचं युग, व्याख्यानाचं युग, कामगाराचं युग, संततिनियमनाचं युग अशीं अनेक लेबलं आजच्या युगावर चिकटविलीं जात आहेत. आणि गंमत ही कीं, ज्यानं त्यानं मनाशीं ठरविलेल्या व्याख्या व्याप्तिअव्याप्तीच्या कैचींतून सहीसलामत सुटून त्यावर अन्वर्थकतेचं शिक्कामोर्तबहि होत आहे!

मलाहि आजपर्यंत सध्यांच्या युगाचीं निरनिराळीं स्वरूपं पहावयास मिळालीं आहेत. अगदीं लहानपणीं भांडण हाच आजच्या युगाचा प्रमुख धर्म आहे अशी माझी प्रामाणिक समजूत होती. आमच्या वाड्यासमोरच्या विहिरीनं पहिल्या प्रथम हा युगविशेष माझ्या लक्षांत आणून दिला.

दिशा उजळल्या नाहींत तोंच रहाटाचा कबजा घेण्याच्या उद्देशानं विहिरीवर जमा झालेल्या आळींतल्या बायका एकमेकींवर अशा कांहीं हिरीरीनं अन् आवेशानं तुटून पडत कीं—

त्या वयांत मला संस्कृत येत नव्हतं म्हणून ठीक होतं. नाहीं तर पराक्रमाला पौरुष हा प्रतिशब्द कायम टेवणाऱ्या आधुनिक भाषा पंडितांची कींव करायला मीं कमी केलं नसतं !

कच्च्या चिंचांवरून वर्गांत निघालेल्या कुरापती, घरापुढल्या आंब्याच्या मर्यादेवरून शेजाऱ्यापाजाऱ्यांत झालेलं सोनपत, पानपत वगैरे प्रसंगांवरून माझ्या मनांत दृढमूल होत गेलेला भांडणाविषयींचा सिद्धांत रशिया अमेरिकेसारखीं राष्ट्रं प्रचंड प्रमाणावर शस्त्रनिर्मिति करीत असल्याच्या बातम्या वाचून अधिकच खोलवर रुजला.

वाढत्या वयाबरोबर आजच्या युगाची अधिकाधिक वैशिष्ट्यं माझ्या लक्षांत येऊं लागलीं.

पण या सर्वांत टळक वैशिष्ट्य कोणतं असा जर मला कुणी प्रश्न विचारला तर मी त्याला उत्तर देईन, ' मतभेद ! '

मतभेद हाच आजच्या युगाचा डोळ्यांत भरण्यासारखा विशेष आहे हें कुणालाहि कबूल करावं लागेल.

' मांजरीला मिशा असतात ' या बेचीच्या विधानाला हरकत घेऊन स्वतःचा प्रामाणिक मतभेद व्यक्त करणाऱ्या बाळूचं स्वभावचित्र कोल्हटकरांनीं एका छोट्याशा गोष्टींत रेखाटलं आहे. तळिरामाच्या प्रकृतीविषयीं परस्परविरुद्ध मतं व्यक्तविणाऱ्या डॉक्टर आणि वैद्याची स्वभावरेखा गडकऱ्यांनीं एकचप्यालयांत अजरामर करून ठेवली आहे !

कोल्हटकरांच्या गोष्टींतील मतभेदाला बाल्यसुलभ अज्ञान अन् डॉक्टर-वैद्याच्या मतभेदाला दारू कारण असावी असा एकेकाळीं माझा समज होता. पण अनुभवानं माझं तें मत साफ बदललं आहे. मनुष्य जाणतेपणीं कसल्याहि मादक पदार्थाचा अंमल चढला नसतां—कायद्याच्या भाषेंत सांगायचं म्हणजे अक्कल हुषारीनं—नशापाणी न करतांच कुठल्याहि गोष्टीबद्दल मतभेद व्यक्त करूं शकतो !

नाहीं तर त्या दिवशीं यःकश्चित सहलीसाठीं स्थळ निश्चित करण्याच्या बाबतींत आम्हां शिक्षकांत इतकी खडाजंगी कशाला उडाली असती ?

वसईचा किल्ला, भाटघरचं धरण, कनकेश्वराचा डोंगर, माथेरान, घारापुरी इत्यादि अनेक निसर्गरम्य ठिकाणं सुचवलीं गेलीं असूनहि या नाहीं त्या कारणानं प्रत्येक स्थळाच्या बाबतींत नापसंती दर्शविली जाऊं लागली.

वसईच्या किल्ल्याची सूचना मांडणाऱ्या शिक्षकाचा चिमाजी अप्पांचा वंशज म्हणून एखाद्यानं उपहास करावा अन् वसईच्या किल्ल्या-ऐवजीं कनकेश्वराच्या डोंगराची सूचना पुढें आणावी तोंच चिमाजी अप्पाच्या वंशजानं ' हे आले महादेवापुढचे ! ' म्हणून त्यालाहि चिमटा काढावा, असं बराच वेळ चाललं होतं ! शेवटीं बरीचशी भवती न भवती झाल्यावर कर्जतच्या आंबराईत ट्रिप न्यायचा सर्वानुमतें बेत ठरला.

उशीरां का होईना पण आंबराईत जाण्याचा बेत ठरल्याबद्दल मला स्वतःला अतिशय आनंद झाला. मंथनांतून हालाहलाबरोबरच अमृतहि प्रकट व्हावं असंच मला वाटलं. नाहीं तरी आम्रवृक्षाला अमृताच्या कल-शाची उपमा द्यायचा कविसंकेत रूढ आहेच ना !

आंबराईविषयीं मला वाटणारं आकर्षण लहानपणाइतकंच आजच्या घटकेलाहि कायम आहे ! आमच्या गांवालगतच्या आंबराईत मी घालवि-लेल्या घटका आठवल्या कीं साऱ्या अंगावर आनंदाचे रोमांच उभे राह-तात. पाडाच्या आंब्याइतकंच कच्च्या कैऱ्यांतहि काव्य आहे ही गोष्ट कवींच्या लक्षांत कशी येत नाहीं, याचंच मला राहून राहून आश्चर्य वाटतं ! फांदीफांदींतून उठणाऱ्या कोकिळांच्या आलापाबरोबरच कैऱ्यामुळं बसलेल्या बाळगोपाळांच्या आवाजानंहि आंबराईचं जीवन धन्य केलेलं असतं हें नाकबूल करून चालणार नाहीं. गणित चुकल्यामुळं शाळेंत मास्तरांचा अन् घरीं वडील माणसांचा मला मार बसे; त्यावेळीं याच आंबराईनं शीतळ फुंकर घालून माझ्या शरीराचा दाह शमविला आहे. संसाराची ज़बाबदारी अंगा-

वर पडल्यावर या नाहीं त्या कारणानं अनेकदां अनुभवावा लागलेला मनः-स्तापहि याच गार छायेखालीं निवला आहे.

अगदीं लहानपणींच घडून आलेला आई—वडिलांचा चिरवियोग, आर्थिक ओढघस्तीमुळं बंद करावं लागलेलं कॉलेजचं शिक्षण, माता-पित्यांच्या छत्राची उणीव भासूं न देणाऱ्या प्रेमळ काका—काकीचा एका वर्षाच्या अंतरानं घडून आलेला मृत्यु, इत्यादि अनेक कटु प्रसंगांचा मला या शीतळाईत विसर पडला आहे !

दुःखाप्रमाणंच सुखाच्या क्षणींहि माणसाला आंबराईचं सान्निध्य हवंहवंसं वाटतं यांत शंकाच नाहीं !

यौवनाच्या पहिल्या स्पर्शानं पुलकित झालेल्या दोन प्रेमी जीवांना आपापल्या मनांतल्या नाजूक, तरल सुखसंवेदना व्यक्त करायला आंबराई-सारखं दुसरं कोणतं निवांत स्थळ सांपडेल ? आणि मग त्यांना केव्हां तरी ऐकलेल्या, ' खुण बाळपणांत, आंबेवनांत, पहिली ओळख गोडीची ! ' या किंवा ' पाडाला आला आंबा ', ' आंबेवनांत जाऊं या दूर ' या प्रणय गीतांतली खुमारी याच प्रशांत, निःशब्द वातावरणांत नव्यानं अनुभवतां येते ना !

प्रणयांतली उत्कटता ओसरल्यानंतरहि मनुष्य आंबराईला विसरत नाहीं. मातृपदाची चाहूल लागलेल्या स्त्रीला याच रम्य ठिकाणीं हिंदो-ळ्यावर बसून मंदमंद झोके घेतांना ' डोहाळे ' ऐकण्यांत स्वर्गसुखाचा लाभ होत नाहीं का ? ·

घनदाट शाखाविस्तार, सुगंधित मंजरी, रसाळ फलभार, गार सांवली, मत्त आलाप इत्यादि वैभवांनीं समृद्ध बनलेली आंबराई मला प्राचीन काळांतील एखाद्या आदर्श समाजजीवनाचं प्रतीक वाटतें. व्यक्तिशः आपापल्या उत्कर्षासाठीं धडपडणाऱ्या आजच्या व्यक्तिस्वातंत्र्यवादी मनु-ष्याला आंबराईचं सान्निध्य खचित प्रेरक वाटेल ! सामुदायिक जीवनाच्या

विकासचं इतकं मव्योदात्त चित्र क्वचितच एखाद्या कांदबरीकाराला अगर चित्रकाराला रेखाटतां येणं शक्य आहे !

आमच्यांतलं सामुदायिक मन जागं व्हावं, पायापुरतं पाहण्याची आमची संकुचित दृष्टि विशाल व्हावी म्हणून आमचे पुढारी मोठे सभा भरवून कंठशोष करीत असतात.

पण मी मात्र हळूंच सांगू शकेन, पुढाऱ्यांच्या सभेऐवजीं आंबराईत जाण्याचा परिपाठ ठेवा, म्हणजे तुम्हांला समष्टिजीवनाची यथार्थ कल्पना येऊं शकेल !

प्रसिद्धी—महाराष्ट्र ( पुणें ) फेब्रुवारी १९४९

## धबधबा : : ६

वाङ्मयाचा तो कोणता प्रकार होता हें मला सांगतां येणार नाहीं. अन् तो जाणून घ्यायची विशेषशी उत्सुकताहि माझ्या मनाला वाटली नाहीं. पण अवघ्या पांचसहा ओळींच्या त्या तुटपुंजा लेखांत लेखकानं जो विचार प्रकट केला होता तो पाहून साहित्यिक महाशयांच्या मेंदूची मात्र ' आतकुळी ' ठरविण्याचे सायास मला घ्यावेसे वाटले.

रस्त्यानं कांदेबटाटे विकीत जाणाऱ्या एका हातगाडीवाल्याकडून एक तरुणी दोन रत्तल कांदे खरेदी करते. व्यापाराच्या निमित्तानं कां होईना पण एका रूपसंपन्न युवतीशीं बोलण्याची त्याला संधि मिळालेली पाहून कोणा एका यौवनप्रांतांतल्या मुशाफराच्या ' रतिभावाचं ' उद्दीपन होऊन त्याच्या तोंडून उद्गार बाहेर पडतो, ' अहाहा ! देवा, मी फेरीवाला असतों तर ? '

सौंदर्याच्या क्षुधेनं वखवखलेल्या त्या कामार्त तरुणास तसंच चुळबुळत ठेऊन लेखकानं तिथंच आपल्या कलाकृतीचा शेवट केला होता !

उठल्यासुटल्या मदनाला वेठीला धरून त्याच्या पाठीवर वाङ्मयाच्या गोणी लादणाऱ्या महाराष्ट्र–प्रतिभेचा उपद्व्याप पाहिला म्हणजे अक्कलच्या कांद्याची उपपत्ति सहज लावतां येते. संस्कृतांत अनंगाला कंदर्प म्हटलं नाहीं का ? चोवीस तास ज्याचा मेंदू विषयवासनेनं पछाडलेला

असतो त्याच्या अकलेचा ' कांदा ' झाला आहे असं म्हणणंच रास्त होणार नाहीं का ?

पण त्या लेखकाच्या वैषयिकतेपेक्षांहि निराळ्याच कारणानं मला याचा तो लेख आक्षेपार्ह वाटला. शृंगारभावनाच कां होईना पण तिला आकर्षक, व्यवस्थित स्वरूप देऊन, कलाकृतीच्या द्वारें तिचा हृद्य आविष्कार करून ती वाचकांसमोर मांडण्याचा लेखकानं प्रयत्न केला असतां तर मला त्याबद्दल कांहींच म्हणायचं कारण पडलं नसतं ! पण गुळमुळीत शब्दांत शृंगारासारख्या रसराजाला आवाहन अन् नंतर लगेच त्याची मिळमिळीतपणें ' बोळवण ' करून लेखकानं काय साधलं हेंच मला कळत नाहीं !

सकाळी झोपेतून उठल्यावर आळस देतांना एखाद्या पुरंध्रीच्या देहसंपदेला पडणारे आळोखे पिळोखे म्हणजे अभिजात अंगविक्षेप असल्याचा एखाद्याने आचरट शोध लावावा, दाढी घोटतांना स्वतःशीं चालणारी गुणगुण ' हिज मास्टर्स व्हाईस ' कंपनीनं ध्वनिमुद्रित करण्याच्या योग्यतेची असल्याचा एखाद्याला मूर्ख साक्षात्कार व्हावा, खोकला लागून रात्रभर कफाचे बेंडके टाकणाऱ्या पेंशनर प्राण्यानं गीतेंतल्या वचनाच्या आधारानें स्वतः संयमी असल्याची खातरजमा करून घ्यावी असाच कांहींसा प्रकार वरील लेखकाच्या बाबतींत घडला आहे असं वाटतं ! चार अक्षरं लिहितां वाचतां आलीं म्हणजे अक्षरवाङ्मय लिहितां येत असल्याची समजूत करून घेणारा हा लेखक वरील महाभागांसारख्यांच्या माळेंत मेरुमणी म्हणून खपण्यासारखा नव्हता का ? देवदूतांत नसलेलं धाडस मूर्खांच्या ठिकाणीं आढळून येतं हेंच खरं !

पण असलं निःसत्व, रुचिहीन, सपक वाङ्मय निर्माण करणाऱ्या त्या लेखकालाच जबाबदार धरतां येईल का ? जमिनींतून मिळतील तीं जिवनद्रव्यं शोषून घेणाऱ्या वृक्षाप्रमाणं लेखक सभोंवारच्या परिस्थितींतून साहित्य निर्मितीस आवश्यक ती सामुग्री संकलित करीत असतो. परिस्थितींतच

नाहीं तें लेखकाच्या अनुभूतींत तरी कुठून येणार? अन् सभोंवारच्या वातावरणांत त्याला जें कांहीं गवसतं तेंच निकस, रोगट, खुरटलेलं असेल तर त्याच्या साहित्यांतहि त्याचा आढळ व्हावा हेंच स्वाभाविक नाहीं का?

हल्लीं जीवनाभोंवतीचं क्षेत्रच इतकं संकुचित झालं आहे कीं, आम्हांला भव्यतेचा, उत्कटतेचा, दिव्यतेचा साक्षात्कार राहोच, नुसतं पुसट दर्शनहि होणं अशक्य झालं आहे!

मनुष्यामनुष्यांतील प्रेमभाव नष्ट होत चालला, विश्वासाची भावना लोपूं लागली, जीवनमूल्यांविषयीं अश्रद्धा उत्पन्न होत चालली, त्यागाऐवजीं स्वार्थाची कल्पना बळावत गेली, म्हणून उच्च ध्येय, उज्ज्वल आकांक्षा यांना स्थान उरलं नाहीं; अशा स्थितींत वाल्मिकी, व्यास अगर होमर, व्हर्जिल, मिल्टन इत्यादि पूर्वसूरींच्या महाकाव्यांना लाभलेली भव्योदात्त बैठक आपल्या काव्यांना लाभली नाहीं म्हणून तक्रार करण्यांत काय स्वारस्य आहे?

पण याचा अर्थ आजच्या कविप्रतिभेनं क्षुद्र, नीरस, निर्जीव विषयांभोंवतींच रुंजी घालण्यांत संतोष मानावा असा करतां येईल का? मिळमिळीत अवघें टाकावें। उत्कट, भव्य तेंचि घ्यावें॥ ही समर्थांची उक्ति उपेक्षणीय समजावी का? 'गगनाहुनि वाड अन् ब्रह्मांडाहुनि जाड' अशी काव्यस्वरूपासंबंधींची त्यांची अपेक्षा निरर्थक मानावी का?

छेः! छेः! रामदासांच्या काळांतसुद्धां सामाजिक नि राजकीय परिस्थिति अशी कोणती आदर्श होती! दास्यविमोचनाच्या ध्येयानं प्रेरित होऊन शिवरायाभोंवतीं जमलेले मुठभर मावळे सोडले तर बाकीचे सारे स्वार्थांधतेनं देशहितावर निखारे ठेवण्यास उद्युक्त झालेले, अज्ञानानं ग्रासलेले, दारिद्र्यानं गांजलेले किंवा निवृत्तीच्या ध्यासानं वेडेपिसे बनलेले अशांपैकींच होते ना? पण अशाहि प्रतिकूल क्षणीं या राजकारणी संतानं 'आनंदभुवनवनाचं' जें शब्दचित्र रेखाटलं तें किती भव्य, किती उदात्त, किती रमणीय होतं! समाजाच्या मनावर बिंबविलेली 'महाराष्ट्र-धर्माची'

कल्पना केवढी विशाल होती ! नाना पंथ, नाना मतं यांच्या गलबल्यांत सांपडून, गोंधळून गेलेल्या जीवाला त्यांनीं जी विवेकाची शिकवण दिली ती किती धवधवीत, किती ठाशीव होती ! ब्रह्मांडाला भेदून त्यापलीकडे 'रामकथा' नेऊं पाहणारी त्यांची कल्पकता किती पल्लेदार, किती जोमदार होती !

नैतिक गुणांचे भव्य आदर्श समाजासमोर ठेवणारे वाल्मिकी मुनी, मानवी विचाराविकारांचा भरघोस आविष्कार करणारे व्यास महर्षि, रघुवंशाच्या रूपानं तत्कालीन राष्ट्रीय मताला मुखर करणारा, आर्यसंस्कृतीचं विराट, अद्‌भुतरम्य चित्र रेखाटणारा कवि कुलगुरु या साऱ्या आर्षविदग्ध महाकवींच्या उत्तुंग, विश्वव्यापी कलाकृति पाहून आम्हांला कांहींच कां प्रेरणा होणार नाही ?

खात्रीनं होईल ! ज्यांत महाकाव्याची सामुग्री सांठविली आहे असे कितीतरी प्रसंग, कितीतरी विषय आजच्या परिस्थितींतहि आढळून येतील. मात्र व्यापक सहानुभूतीनं त्यांच्याकडे पहायला शिकायलं हवं ! ती विशाल दृष्टि अंगीं बाणली म्हणजे संजयाप्रमाणं कुणालाहि अदृश्य घटना दृग्गोचार होतील, लपलेलीं सौंदर्यं दिसूं लागतील, अज्ञात शक्ति प्रतीत होतील !

४२ च्या क्रांतिलढ्यांत ओजस्वी महाकाव्यासाठीं आवश्यक असलेलीं बीजं दडलीं नाहींत असं कोण म्हणेल ! निजामच्या राजवटींतील असहाय, पीडित जनतेच्या जीवनक्रमावर करुण, भीषण काव्य लिहितां येणार नाहीं असं कुणाला वाटेल ? स्वातंत्र्यवीर सावरकरांचं कष्टमय, त्यागी आयुष्य धीरोदात्त, रुद्रगंभीर काव्यनिर्मितीसाठीं योग्य विषय नाहीं असं कोण सांगू शकेल ? हुतात्मा चिमण अष्टेकरांचं जीवन वत्सल रसाला पोषक म्हणून किंवा अरविंदबाबूंच्या योगाश्रमांतील नियतचित्त पुरुषाची मुक्तिचतुष्टयाची साधना शांत; रसात्मक काव्याचा आलंबन, विभाव म्हणून निवडायला कोणती हरकत आहे ?

सारांश सभोंवतालच्या परिस्थितीकडे डोळे उघडे ठेऊन सहृदयतेनं बघणाऱ्या प्रतिभाशाली कवीला तिच्यांतून काव्य निष्पत्तीसाठीं हवा असलेला भरपूर मालमसाला सांपडू शकेल ! राजकीय आकांक्षा, सामाजिक संघर्ष, पूर्णतेची तहान, विश्वकल्याणाची ईर्ष्या जीवनासंबंधींचा दिव्य असंतोष ( Divine discontentment ) यांतूनच तेजस्वी अर्थधन, हृदयंगम काव्यसंपदा निपजू शकेल, यांतूनच गरुडासारखी उड्डाणक्षम, धबधब्यासारखी प्रचंड, हिमालयासारखी उत्तुंग, आकाशासारखी अनंत अन् सागरासारखी ध्वनिगंभीर काव्यविरचना उदयाला येईल—

कांदेबटाटेवाल्याचा हेवा करणाऱ्या मनोवृत्तींतून नव्हे, हें निश्चित.

प्रसिद्धी वसंत जानेवारी १९५०

# शॉ. पॅायशा आणि समाजशास्त्र : : ७

मध्यरात्र टळून गेली तरी निद्रादेवीच्या आगमनाचं एक म्हणता एक सुद्धां चिन्ह मला दिसेना. प्राचीन काळीं मीलन किंवा विरह या दोनच गोष्टी मनुष्याच्या झोपेंत व्यत्यय आणीत असाव्यात! फारां दिवसांनीं सीतेची भेट झाल्यावर आरोग्याचे नियम धाब्यावर बसवून तिच्याशीं रात्रभर गप्पागोष्टी करीत बसलेले प्रभु रामचंद्र किंवा परदेशाला प्रियकर गेल्यावर चंदनादि शीतलोपचारांनीं विरहताप शमवूं पाहणाऱ्या व्याकूल ललना यांनीं कविमुखांनीं हें सत्य सांगून टाकलं नाहीं का!

काव्याकडून गीतेसारख्या तत्त्वज्ञानपर ग्रंथाकडे वळलों तर तिथं या बाबतींत निराळंच मत पहावयास मिळतं. संयमी पुरुष जागत बसतात असं श्रीकृष्णांनीं गीतेंत एका ठिकाणीं म्हटलं आहे.

पण कविता असो नाहीं तर गीता असो, जागरणाबद्दल तिच्यांत व्यक्त झालेला अभिप्राय आजच्या युगांत कांहीं मनुष्याच्या अनुभवाला यायचा नाहीं अशी माझी खात्री आहे!

टिचभर लांबीरुंदीच्या खुराड्यांत दाटीवाटीन संसार करणारी आजची गृहदेवता माहेरीं गेल्यावर विरहातन्हानं होरपळून निघण्याऐवजीं तिथल्या शांत, निरामय वातावरणांत डाराडूर झोंप घेत असेल असा तर्क बांधणंच वस्तुस्थितीला धरून होणार नाहीं का!

संयमी पुरुष जागत असतात हा श्रीकृष्णाचा निर्वाळाहि द्वापार-युगापुरता खरा असेल. पण या कलियुगांत संयम सुटलेल्या माणसावरच जागरण करीत बसण्याची पाळी येते हें कांहीं नव्यानं कुणाला सांगायला नको ! चहा, नाटक-सिनेमा, कादंबऱ्या इत्यादींच्या बाबतींत तोल सुटल्या-मुळंच आजच्या मानवाची झोंप पार उडाली ना ?

असंयमाच्या जोडीला निद्रानाशाचीं आणखी कितीतरी कारणं सागतां येतील. रेशनिंगचं धान्य, चाळीचाळींतून किंकाळणारे रेडिओ, नळावरलीं भांडणं, वेळीं अवेळीं दुधाचा रतीब घालायला येणारे भय्ये इत्यादि गोष्टी आजच्या मानवाला सुखानं झोंप येऊं देत नाहींत !

माझंच पहाना ! त्या दिवशीं माझ्या डोळ्याला डोळा लागत नव्हता तो आमच्या खोलींत एकाएकीं डांसांचा उपद्रव झाल्यामुळं !

निद्रेला देवी कां म्हणतात हें त्या दिवशीं मला नीट समजलं ! देवी नुसत्या आराधनेनं भक्तावर अनुग्रह करीत नाहीं, तिला भक्तीबरोबर बळीहि हवा असतो नाहीं का ? ऊद, पॉयशा, डी. डी. टी. इत्यादि साऱ्या जुन्या नव्या संहारक अस्त्रांचा आश्रय करून मी त्या दिवशी मच्छरांना नेस्तनाबूत करण्याचा सपाटा चालविला !

पण काय आश्चर्य ! ‘ मानवाचं रक्तशोषण हा आमचा जन्मसिद्ध हक्क आहे ’ असा एकमुखानं उद्‌घोष करीत डांसाचे जथ्थेच्या जथ्थे मच्छर-दाणीवर तुटून पडूं लागले. एकवीस वेळां निःक्षत्रीय पृथ्वि करायला निघालेल्या परशुरामाच्या उत्साहानं मी खोलीभर पॉयशाचा फवारा उडवूं लागलों.

दीड वाजून गेला तरी मानव विरुद्ध मच्छर यांच्यांतला संग्राम संपुष्टांत येण्याचीं लक्षणं दिसेनात ! मच्छरदाणीची तटबंदी फोडून गनीम जेर करणार असा रंग दिसूं लागला. हवालदिल होवोन अस्मादिकांची स्वारी खिडकीपाशीं जाऊन उभी ठाकली. वाऱ्याची गार झुळुक अंगा-वरून जाईल या अपेक्षेनं खिडकी उघडली. पण झुळकीऐवजीं डांसांची

आणखी एक तुकडी नव्या दमानं खोलींत शिरली. 'संघे शक्तिः कलौयुगे' या वचनांतलं सत्य इतक्या विपरीतपणं अनुभवावयास मिळेल हें स्वप्नांत मुद्धां आलं नव्हतं माझ्या !

'पांच मिनिटांत झोंपेच्या तमाम दुष्मनांचा बंदोबस्त करणाऱ्या' औषधाची जाहिरात नुकतीच कुठं तरी माझ्या वाचनांत आली होती.

काय बरं असेल त्याचा पत्ता ?

पण पत्ता आठवण्यापूर्वीं मला निराळ्याच एका गोष्टीची आठवण झाली. दहा बारा दिवसांपूर्वीं आमच्या चाळीचा माळी आपल्या देशाला गेला होता. चाळीमागच्या वाडींत प्रत्येक झाडाच्या बुंध्याशीं वाजवीपेक्षां अधिक पाणी सांचून ठिकठिकाणीं लहान लहान डबकीं निर्माण झालेलीं आजच सकाळीं माझ्या दृष्टीस पडलीं होतीं. तीं नाहींशीं झाल्याशिवाय नुसत्या फवाऱ्यानं किंवा मच्छरदाणीनं डांसांचा उपसर्ग थोडाच टाळतां येण्यासारखा होता ?

सभोंवारच्या परिस्थितीकडे दुर्लक्ष करून स्वतःच्या सुखदुःखांची उपपत्ति लावूं पाहणाऱ्या ममुष्याचीहि माझ्यासारखीच स्थिति होत नसेल का ? मनुष्याच्या सुखदुःखांचं मूळ समाजरचनेंत असतं, हें सत्य दृष्टी-आड करून माझ्यासारखे कितीतरी भाबडे जीव आपापल्या सुखदुःखांचा उगम स्वतःच्याच जीवनांत शोधण्याचा प्रयत्न करीत असतील अन् त्यांत त्यांना यश आलं नाहीं म्हणजे स्वतःशीं खट्टू होऊन बसत असतील !

महिन्याकांठीं तीनशें रुपये पगार मिळत असूनहि तीन आठवड्यांतच आपली गंगाजळी संपुष्टांत येते अन् मग उधार-उसनवार योजना आंखूनच आपणाला आपली आर्थिक घसरगुंडी कशीबशी सांवरतां येते अशा अर्थाची तक्रार माझा एक मित्र नेहमीं करीत असतो. त्याचं म्हणणं कांहीं खोटं नाहीं. पण स्वतःच्या आर्थिक ओढग्रस्तीची जी कारणमीमांसा तो लावतो ती मात्र ऐकण्यासारखी आहे.

'आपलाच दाम खोटा !' या सूत्रानं सुरुवात करून तो आपलं

अर्थशास्त्र ऐकवूं लागतो, ' आमचे आजोबा अवघ्या पंधरा रुपयांत प्रपंच चालवीत होते, पण मला इतका पगार मिळत असूनहि तो अपुरा पडावा तेव्हां आपलंच कपाळ फुटकं म्हणूं नये तर काय ! '

पण खरी मौज पुढंच आहे. दररोज सांजसकाळ गांवांतल्या साऱ्या देवांच्या उंबऱ्यांवर ही स्वारी आपलं ' फुटकं ' कपाळ जोरजोरानं आपटते अन् त्यामुळंच तें सांधलं जाणार आहे अशी बिचाऱ्याला भोळी आशा वाटत असते !

बोला ! माझ्या या मित्राचं स्वतःच्या आर्थिक दुःस्थितीचं निदान अन् त्यावरला उपाय आहे कीं नाहीं मासलेवाईक ! गेल्या महायुद्धानं साऱ्या जगाचीच आर्थिक घडी जिथं विस्कटून टाकली तिथं वैयक्तिक जीवनांतल्या ' अनर्थपरंपरेबद्दल ' कुटुंबांतल्या कर्त्या पुरुषाला जबाबदार धरणं कितपत योग्य होईल ?

पतप्रधान नेहरूंना रेशनच्या रांगेत उभं राहावं लागल, अशी काहीं महिन्यांपूर्वीं मी वर्तमानपत्रांत बातमी वाचली होती. एकेकाळीं ज्यांच्या दाराशीं हत्ती झुलत असत त्या जवाहरलालांना वाण्याच्या दुकानासमोर धान्यासाठीं तिष्ठत उभं राहावं लागावं हा केवढा दैवदुर्विलास म्हणायचा ! पण आपले पीडादायक ग्रह स्वतःच्या कुंडलींत नसून ते बर्लीन, मास्को, टोकियो या स्थळीं बसले आहेत अन् ते आपल्याच नव्हे तर सबंध विश्वाच्याच राशीला आले आहेत हें सत्य पंडितजींना उमगतां आलं. म्हणूनच ना ते विश्वकल्याणाच्या महान् स्वप्नांत स्वतःच्या इच्छाआकांक्षांची पूर्ति झाल्याचं समाधान अनुभवूं शकतात ? समष्टिजीवनाच्या विकासांत आत्मविकसनाचं ध्येय अंतर्भूत असल्याची श्रद्धा बाळगूं शकतात ?

बारा महिने जीवाचं रान करून सुखाच्या सांवलीला पारखा होणाऱ्या अजाण शेतकऱ्यापासून तो अहोरात्र चिमण्या बालमनांच्या कळ्या फुलवून नैराश्येचीं शल्यं उराशीं बाळगणाऱ्या शाळामास्तरापर्यंत

प्रत्येकजण स्वतःच्या विपन्नावस्थेबद्दल आपापल्या प्रारब्धाला दोष देत बसलेला मला आढळून येतो, तेव्हां एकापेक्षां अनेक कारणांनीं मला त्याची कींव करावीशी वाटते !

जगांत विद्वानांची उपेक्षां होऊं लागली, कलावंतांची कदर होई-नाशी झाली, गरिबांच्या गुणांना किंमत उरली नाहीं म्हणजे समाज-व्यवस्थेंतच कुठं तरी बिघाड झाला असला पाहिजे असं खुशाल समजावं !

श्रीमंतांच्या पदरांत सद्‌गुणांचं माप टाकलं जाणं, नीतिभ्रष्टांना सुखाच्या राशीवर लोळण्याची संधि मिळणं किंवा मूर्खांच्या शब्दांना हुक-मतीचं स्वरूप प्राप्त होणं हा वैयक्तिक कर्मभोगापेक्षां विकृत समाजरचने-चाच दुर्विपाक मानायला हवा असं माझं स्पष्ट मत आहे.

ही वस्तुस्थिति डोळ्यांआड करून व्यक्तीच्या अंगभूत गुणदोषांतच तिच्या सुखदुःखांचं अगर यशापयशाचं मूळ शोधणारीं अन् तें शोधतांना दैव, प्राक्तन, अदृष्ट इत्यादि शब्दांचा आधार घेणारीं माणसं पाहिलीं कीं मला त्यांना बर्नार्ड शॉची ती उक्ति सांगावीशी वाटते. त्यानं म्हटलंय—

पण शॉच्या सुभाषितापेक्षां त्या दिवशींचा तो पॉयशाचाच प्रसंग त्यांना सांगितला तर अधिक बोधप्रद होईल, नाहीं का ?

## सिंहिणीचा प्रियकर ! : : ८

जन्म मनुष्याचा पण वृत्ति पांखराची, पेशा कारकुनाचा पण चाळा कवीचा, असा एक तरुण आपल्या नियोजित वधूला भविष्यकालीन कर्तृत्वाचं अंदाजपत्रक ऐकवितांना म्हणतो, ' हे प्रिये, संध्याकालीन रंगांत तुझ्या साड्या बुचकळून काढीन, ब्लाऊजजंपरसाठीं नक्षत्रांच्या बटनस् आणीन, धुक्याच्या बॉर्डाज शिवीन, वेणीच्या टोंकाला बांधण्यासाठीं इंद्र-धनुष्याची फीत आणीन, चंद्रसूर्यांच्या इयररिंग्ज, दंवबिंदूंची मोहनमाळ, मेघांचा सुरमा...

कविप्रतिभेला पंख अन् कम्युनिस्ट कार्यकर्त्याला कंठ फुटल्यावर त्यांना थोपवून धरणं एकंदरीनं कठीणच ! तरुणपणीं मनुष्याची कल्पकता आकाशापर्यंत भराऱ्या मारूं शकत असली तरी त्याच्या यौवनावस्थेला गरुडपंचविशी म्हणून कांहीं कुणी गौरवीत नाहीं हेंच खरं !

मात्र हें निरंकुशत्व तरुण वयांतच माणसाच्या ठिकाणीं असतं हा आक्षेप मला सर्वस्वी बरोबर वाटत नाहीं. पंचविशी ओलांडून प्रौढ दशेंत गेलेलीं, अनुभवानं अन् ज्ञानानं प्रगल्भ बनलेलीं वयस्क माणसं तरी भराऱ्या मारण्यांत काय कमी पटाईत असतात ! आटोक्यापलीकडे असलेलीं ध्येयं प्रत्यक्षांत उतरवूं पाहणारे ध्येयात्मे मला तरी वरील कविराजांच्याच कोटींतले वाटतात !

मुंबई महाराष्ट्रांत असावी असा आग्रह धरणाऱ्या आम्हां मराठी भाषिकांवर आग पाखडणाऱ्या भांडवलदार वृत्तपत्रांच्या अंतरींचा हेतु आम्हांला समजूं शकतो. पण मेंदू थंड ठेवून निर्विकार वृत्तीनं आम्हांला भाषाभेद, प्रांतभेद, धर्मभेद विसरायला सांगणारे आमच्यांतलेच कांहीं पुढारी पाहिले म्हणजे त्यांचा ध्येयवाद आकाशाइतका विशाल पण तितकाच पोकळीहि असल्याची खात्री पटूं लागते ! प्रथम स्वभाषा, स्वदेश, स्वसंस्कृति यांच्याविषयीं मनुष्याला आदर वाटेल, नंतर इतरांच्या भाषेविषयीं, प्रांताविषयीं किंवा संस्कृतिविषयीं—हें नैसर्गिक सत्य दृष्टीआड करायला या पुढाऱ्यांना सांगवतं तरी कसं हेंच मला कळत नाहीं. " Near the shirt is nearer the skin is ! " असं हॉलकेनच्या कोणत्याशा कादंबरींतलं एक पात्र म्हणतं. किती सत्य आहे त्याचा हा उद्गार ! रेशमी सदरा झाला म्हणून कांहीं कुणी तो आपल्या कातडीपेक्षां प्रिय मानीत नाहीं.

प्रकृतिधर्माशीं प्रतारणा करणाऱ्या नि इतरांनाहि करायला लावणाऱ्या या महाभागांचा हा खटाटोप सांध्यरंगांत प्रेयसीच्या साड्या बुचकळूं पाहणाऱ्या कवीच्या उद्योगापेक्षां कोणता निराळा आहे ?

विश्वबंधुत्वाची कल्पनाहि मला अशीच अतिरंजित, अवास्तव वाटते. एकाच मानवधर्माच्या ध्वजाखालीं जमलेल्या अखिल भूतमात्रांतील विद्वेष्याला अन् वैराला कायमची मूठमाती मिळाल्याचं दृश्य पहायला सांपडल तर कुणाला नको आहे ? पण विषमतेवरच उभारणी झालेल्या या सृष्टींत सर्वजण समतेच्या एकाच पातळीवर आल्याचं स्वप्न रंगवणं—

स्वप्न हें प्रकृतींत बिघाड झाल्याचं लक्षण मानतात तें उगीच नाहीं ! चहाच्या पत्तीपासून तों जीवनाच्या हेतुपर्यंत आणि कोटाच्या शिलाईपासून तों सृष्टीच्या मुळाशीं असलेल्या आदिकारणापर्यंत प्रत्येक बाबतींत जिथं भिन्न मतं, भिन्न दृष्टिकोन, भिन्न अभिरुचि यांचा आग्नळ

होतो, तिथं एकाच प्रकारच्या विचारसरणीच्या दावणीनं साऱ्या विश्वाची मोट आवळण्याचा प्रयत्न करणं कितपत युक्त होईल ?

जागतिक शांति प्रस्थापित करण्याच्या अन् राष्ट्राराष्ट्रांत सलोखा घडवून आणण्याच्या हेतूनं जन्माला आलेल्या शस्त्रसंन्यास परिषदा, लीग ऑफ नेशन्स किंवा यु. नो. सारख्या संस्थांच्या सद्धेतूंना खुशाल पायांखालीं तुडवून शेजारीं शेजारीं नांदणारीं राष्ट्रं परस्परावर अग्नयस्त्रांचा मारा करीत असल्याचं दृश्य आपण आज पाहत आहोंत कीं नाहीं ? त्यांच्या उच्च ध्येयवादाची अशी पायमल्ली झालेली कां दृष्टीस पडावी ? प्रकृतिभेदांची अपरिहार्यता लक्षांत न घेतां सब घोडे बारा टक्के या हिशेबानं व्यापार करूं पाहण्याच्या अव्यापारेषु ध्येयवादामुळचं ना ?

ईर्षा, स्पर्धा, अहंकार, विजिगीषा इत्यादि उपजत प्रवृत्तींचं कायमचं निमूर्लन झालं तरच कदाचित् मनुष्यांतली युद्धप्रवृत्ति नष्ट होऊं शकेल. ती नाहींशी झाल्यावर मानवी जीवनांत स्वारस्य शिल्लक राहील कां हा प्रश्न इथं अप्रस्तुत म्हणून सोडून दिला तरी त्यांचं निर्मूलन होऊं शकेल कां हा प्रश्न उरतोच !

शांतताकरारावर झालेल्या स्वाक्षऱ्यांची शाई वाळण्यापूर्वींच जगभर भडकलेल्या महायुद्धाच्या ज्वाळांनीं या प्रश्नाचं कधींच उत्तर देऊन टाकलं आहे !

तेव्हां, मोहक पण मानवी सामर्थ्याच्या पलीकडे असलेल्या आदर्शवादांच्या पाठीमागं लागून स्वतःबरोबर इतरे जनांचीहि वंचना करण्यापेक्षां शक्याशक्यतेचा विचार करूनच मनुष्यानं आपलं ध्येय ठरवावयास नको का ?

स्वतःच्या घरासभोंवतलाची जागा प्रत्येकानं स्वच्छ ठेवण्याचा प्रयत्न केला तर साऱ्या गांवांत आपोआपच स्वच्छता नांदूं लागेल असं एका फार्सी कवीनं म्हटलं आहे. म्युनिसिपालिटीचे मेंबर्स निराळ्या अर्थानं त्या कवीला या उद्गाराबद्दल धन्यवाद देतील. मला मात्र मानवी कर्तृत्वाच्या

मर्यादा ओळखून त्यास झेपेल तेंच ध्येय साध्य करण्यास सांगणाऱ्या अन् लहानशा ध्येयपूर्तींतच महान् ध्येयासिद्धीचं श्रेय अंतर्भूत असल्याचं सूचित करणाऱ्या त्या कवीच्या चातुर्याची तारीफ करावीशी वाटतें !

इतर देशांच्या स्वातंत्र्याचा अभिलाष न धरतांहि स्वतःच्या राष्ट्राचा अभिमान वाहणं, इतरांच्या भाषेचा अनादर न करतां मायबोलीच्या उत्कर्षासाठीं प्रयत्न करीत राहणं, हिंसक वृत्तीला उत्तेजन न देतां प्रतिकारापुरता मात्र तिला जीवनांत आश्रय देणं या मर्यादित ध्येयांच्या प्राप्तींतच इतिकर्तव्यता मानायला हवी.

दूरच्या ध्येयांना यदाकदाचित् हात लागण्याचा संभव असला तरी तीं कवटाळण्याचा यत्न करूं पाहणं म्हणजे सिंहिणीशीं उंदरानं लग्न करण्याची इच्छा दर्शविण्याइतकंच अव्यवहार्य आहे !

इसापनीतींतली ती उंदराची गोष्ट तुम्हांला ठाऊक आहे ना ? पारध्याच्या जाळ्यांतून उंदराच्या हिकमतीमुळं मुक्त झालेल्या सिंहानं त्याच्याविषयीं कृतज्ञता व्यक्तविण्यासाठीं त्याला हवं तें मागायला सांगितलं तेव्हां त्या वेड्या उंदरानं त्याच्या मुलीशीं लग्न करण्याची इच्छा दर्शविली. सिंहानं त्याची महत्त्वाकांक्षा पूर्ण केली. पण—अरे रे ! नवरदेव उंदीर अन् नवरीमुलगी सिंहीण ऐटीनं जोड्यानं फिरायला जात असतां बिचारा उंदीर आपल्या नवपरीणित वधूच्या पंज्याखालीं सांपडला अन् तत्काळ मरण पावला !

सिंहिणीच्या पायाखालीं चिरडल्या गेलेल्या उंदराची 'ट्रॅजिडी' काय किंवा वल्लभेसाठीं दंवबिंदूंची मोहनमाळ ओंवण्याच्या आकांक्षेपायीं त्या तरुणानं करून घेतलेलं स्वतःचं हंसं काय तत्त्वतः एकच !

अचाट ध्येयांच्या पाठीमागं लागणाऱ्यानं दोहोंपैकीं कुठल्याहि घटनेंत आपलं प्रतिबिंब पहावं ! ज्याच्या त्याच्या आवडीचा प्रश्न आहे तो ! !

## जैसे थे : : ९

भर्तृहरीनं एकंदर सात शल्यांचा आपल्या सुभाषितांत उल्लेख केला आहे. तो या विसाव्या शतकांत जन्माला आला असतां तर या धांवपळीच्या, घाईच्या जीवनांत माणसाला दाढी करण्याइतकी उसन्त न मिळणं हें आठवं शल्य म्हणून त्यानं खात्रीनं आपल्या सुभषितांत निर्देश केला असता.

त्या दिवशीं उशीरां जाग आल्यामुळं दाढी न करतां तसाच शाळेला जाण्यासाठीं मी बाहेर पडलों. दाढी, विधवा आणि वर्गणी या त्रयीभोंवतीं हां हां म्हणतां कुतूहलाचं अन् संशयाचं वातावरण निर्माण करण्यांत लोक किती कुशल असतात हें अनेक वेळां माझ्या प्रत्ययास आलं होतं ! स्वतःच्या दाढीसंबंधीं इतरेजनांना तर्ककुतर्क करायला लावून त्यांचा राजकारणाकडे उपयोग करून घेणाऱ्या शिवाजीमहाराजांचं उदाहरण सोडून दिलं तर बाकी सामान्यांच्या आयुष्यांत दाढीचा उपयोग देशाऐवजीं त्यांच्या शत्रूंच्या जिभा मोकळ्या सुटण्याकडेच अधिक प्रमाणात होऊं शकतो हें सत्य नाकबूल करून चालणार नाहीं.

आणि मनुष्याचा खरा शत्रु त्याचा तोच असतो हा मानसशास्त्रीय सिद्धान्त लक्षांत घेतां, त्या दिवशीं इतरांपेक्षां माझं मनच वाढलेल्या दाढी-

बद्दल नानाप्रकारचे विकल्प नि प्रवाद उकरून काढून मला सतावीत होतं, यांत नवल मानायचं मुळींच कारण नाहीं.

तसं पाहिलं तर माझी दाढी फार वाढली होती असं नव्हे; पण लांब दाढीमुळं स्वतःला मूर्ख समजणारा काजी कल्पित गोष्टींत आढळून येत असला तरी प्रत्यक्ष सृष्टींत हनुवटीखालीं उगवलेल्या बारीक खुंटावरूनहि एकापेक्षां अनेक अर्थांनी स्वतःला ' अजागळ ' समजण्याचा संकेत रूढ असल्यामुळं कांहींशा असमाधानानंच मी त्या दिवशीं शाळेला गेलों.

कोणत्याशा वर्गावर पहिलाच तास पुरवणीवाचनाचा होता. जगांतील थोर थोर व्यक्तींच्या स्वभाववैशिष्ट्यांचा मार्मिक परिचय करून देणारं पुस्तक विद्यार्थी आळीपाळीनं वाचीत होते. जॉर्ज बर्नार्ड शॉ विषयींचा परिचयलेख वाचला जात असतांना विद्यार्थ्यांच्या चर्येवर विशेष आनंद व्यक्त झालेला दिसत होता. माझ्या अन्तःकरणावरसुद्धां शॉची व्यक्तिरेखा ठळकपणें कोरली गेल्यावांचून राहिली नाहीं.

शॉला कुणीसं विचारलं होतं, ' आपणाला टेनीसचा खेळ कसा काय वाटतो ? '

हजरजबाबी शॉनं चटकन् उत्तर दिलं, ' वा ! कसा काय वाटतो म्हणून काय विचारतां ? टेनीसग्राउंडवर चांगलं पुरुषभर उंचीचं गवत वाढलेलं असावं अन् मग त्यांत खेळतांना असा रंग येईल म्हणतां ! '

एका विख्यात अभिनेत्रीनं त्याला विचारलं होतं ,' मी तुमच्याशीं लग्न केलं तर आपल्या संबंधापासून होणार मूल अतिशय सुंदर अन् विद्वान होईल असं नाहीं वाटत तुम्हांला ? '

यावर शॉ चिंतातुर होऊन म्हणाला होता, ' तें खरं ! पण कुणी सांगावं ? त्या मुलाला कदाचित् तुमची बुद्धिमत्ता अन् माझं रूप मिळण्याचा संभव आहे ! मग मात्र मोठीच पंचाईत होईल, नाहीं ? '

एका तत्त्वजिज्ञासूनं शॉला जीवनोत्तर आत्म्याच्या स्थितीसंबंधीं प्रश्न विचारला. त्याला उत्तर देतांना शॉ फटकळपणें म्हणाला,

' कुणा लेकाला ठाऊक ? अन् मला असले कांहीं मानवी तर्काच्या पलीकडे असलेले प्रश्न उलगडता येतात असं तुम्हांला सांगितलंय तरी कुणा महामूर्खानं ? '

शॉच्या विक्षिप्त, सडेतोड पण विचक्षण व्यक्तिमत्वाचं दर्शन घडविणाऱ्या अशा अनेक प्रसंगांचं चित्रण त्या लेखांत झालं होतं !

नव्वदाव्या वर्षींहि ग्रामोफोनची तबकडी लावून तिच्या तालासुरावर नाचणारा शॉ, डॉक्टराना शाकाहाराचं महत्त्व पटवूं पाहणारा शॉ, अवघ्या दहा मिनिटांत उरकला जाणारा नाट्यप्रयोग ( Puppet-play ) लिहिण्याची महत्त्वाकांक्षा बाळगणारा अन् त्या नाट्यकृतीला ' शेक्सपीयर विरुद्ध शॉ ' असं नांव देणारा शॉ इत्यादि स्वाभावरेखांच्या सहाय्यानं प्रकट झालेली त्या थोर, लोकोत्तर, प्रतिभाशाली पुरुषाची प्रतिभा माझ्या मनःपटलावर कायमची कोरली गेली.

त्या दिवशीं घरीं जातांना शॉविषयींचेच विचार माझ्या डोक्यांत भिरभिरत होते. मी मनांत म्हटलं, थोडीशी दाढी वाढतांच शिष्टाचाराचा भंग झाल्याचा बाऊ करून स्वतःशीं कुढणाऱ्या माझ्यासारख्या असंख्य, भीरू परंपराप्रिय माणसांत रूढ कल्पनांना धक्के देणाऱ्या, परंपरागत आचाराविचारांची अन् संकेतांची कोंडी फोडून अकृत्रिम, प्रामाणिक जीवननिष्ठेचं लोण दुसऱ्या पिढीपर्यंत पोंचवणाऱ्या शॉचं व्यक्तिमत्व स्फुरलं तर जगाची केवढी तरी झपाट्यानं प्रगति होईल ! शॉच्या बंडखोर, गतिमान् नि क्रियाशील जीवनाचं आम्हांला नीट आकलन होत नाहीं, अन् म्हणूनच कीं काय, त्याला तुसडा, फटकळ, अहंमन्य, शिष्ट, विक्षिप्त इत्यादि विशेषणांची लाखोली वाहण्यांत आम्हांला धन्यता वाटते !

जीवनाच्या कोणत्याहि क्षेत्रांत दृष्टि टाका. जिथं तिथं सांकेतिकता, परंपरा, गतानुगतिकत्व यांच्याशीं प्रत्येकजण ' जैसे थे ' करारानं बांधला गेल्याचं कटु दृश्य तुमच्या प्रत्ययास आल्यावांचून राहणार नाहीं !

संस्कृत साहित्यांत शुकनलिकान्याय म्हणून एक न्याय प्रसिद्ध आहे. पोपटाला पकडण्यासाठीं फांसेपारधी रानांत दोरीला कांहीं नळ्या अशा खुबीनं बांधून ठेवतात कीं, त्यावर पोपट येऊन बसतांच त्या गरंकन् उलट्या व्हाव्यात. पायात नळी घट्ट धरून ठेवून पोपट उलट्या अवस्थेंत लोंबकळत राहतो. नळीला आपले पाय कायमचे चिकटले असावेत या भ्रामक समजुतीमुळं त्याला उडून जाण्याचंहि भान राहूं शकत नाहीं! पोपटाप्रमाणंच आम्हींहि मानी व संकेतांच्या नि समजुतींच्या आहारीं जाऊन आमच्या कर्तृत्वशक्तीवरील विश्वास गमावून बसत आहोंत हें सत्य कोण नाकारूं शकेल?

भरतमुनींनीं घालून दिलेल्या नेपथ्यरचनेच्या नियमांहून सर्वस्वी भिन्न अशा इब्सेनप्रणीत नाट्यतंत्राचा अवलंब करून आमच्या वऱ्हाडांतल्या कांहीं हौशी तरुणांनीं एक दोन नाटकं रंगभूमीवर आणलीं होतीं. स्थल, काल नि प्रसंग यांच्या बाबतींत एकता ( unity ) साधून नाटककर्त्यानं आपली कलाकृति वास्तव जीवनाशीं जास्तींतजास्त सुसंवादी बनवण्याचा प्रामाणिक पण साहसपूर्ण प्रयत्न केला होता. पण साक्या दिंड्यांची रेलचेल, दाढ्यामिशांचे चेहरे, जंगलाचा पडदा, राळेचे भपकारे अन् राक्षसपार्ट्यांच्या आरोळ्या म्हणजेच नाटक असें समीकरण मांडणाऱ्या आमच्या प्रेक्षक मंडळीला रंगभूमीचा तो कायापालट झालेला कुठून खपायला? त्यांनीं रंगदेवतेला स्तुतिसुमनांऐवजीं भज्यांचा नैवेद्य दाखवूनच तिच्याविषयीं आपली विरोधी भक्ति प्रकट केली!

अन् मौज ही कीं, रंगभूमीसंबंधीं रूढ होऊं पाहणाऱ्या नव्या संकेतांच्या विरोधकांपैकीं मीहि एक होतों!

रंगभूमीचीच गोष्ट कशाला? संगीत, वाङ्मय, राजकारण इत्यादींकडेहि मी आजपर्यंत याच सांकेतिकतेच्या चष्म्यांतून पाहत आलों आहे. रागदारीला वेळेचं बंधन असावं, कुठलाहि राग शुद्ध स्वरूपांतच गायला जावा, ललितवाङ्मयानं सत्य, शिव आणि सौंदर्याचीच कांस

धरावी, धर्मातीत राज्यसंस्था ( Secular State ) अस्तित्वांत आणण्याचा प्रयत्न करूं नये, इत्यादि कल्पनांभोंवतीं माझं स्थितिप्रिय मन अजूनहि डोळे मिटून रुंजी घालत आहे ! हिराबाईसारख्या स्वरसम्राज्ञीच्या कंठांतून जोगीयाचे सूर दुपारीं चार वाजतां कानांवर पडले तरी त्यांतील कारुण्याची अनुभूति तितक्याच प्रकर्षानं श्रोत्यांना मिळूं शकते हें अनेक वेळां मीं पाहिलं आहे ! ओंकारनाथ ठाकूरांसारखे अव्वल दर्जाचे गायक मालकंसांत वर्ज्य मानलेला पंचम मध्येंच लावून श्रुतिसुभग वैचित्र्य निर्माण करूं शकतात हेंहि माझ्या अनुभवास आलं आहे. अन् असं असतांना राग-दारीच्या वेळेसंबंधींचा किंवा शुद्धतेसंबंधींचा माझ्या मनांतील संकेत ढळूं नये हें आश्चर्यच नव्हे का ?

आजच्या यंत्रप्रधान संस्कृतींतून जन्मास आलेल्या विकल, विद्रूप नि विच्छिन्न जीवनासंबंधीं वाङ्मयान जनतेच्या मनांत उबग, जुगुप्सा निर्माण करायला हवी हें बुद्धीला कळत असूनहि मन मात्र सत्य, शिव, सौंदर्याच्या मोहजालांतच गुंतून पडावं हीहि नवलाचीच गोष्ट म्हणूं नये का ! धर्मातीत राज्याच्या कल्पनेंत वर्णद्वेषाची वा कलहाचीं बीजें नष्ट होणार असतील, मानवतेच्या मर्यादा विस्तृत होणार असतील तर खुशाल तिचं स्वागत करावं हें रोमांचकारी स्वप्न मी मनःफलकावर रंगवतों न रंगवतों तोंच त्यावरून श्रद्धेचा बोळा फिरून तें साफ पुसलं जाव हा किती निष्ठुर मनोविलास म्हणायचा ? भवभूतीच्या उत्तर रामचरितासारख्या रमणीय कलाकृतीचा शेवट शोकपर्यवसायीच व्हावयास हवा होता, अर्थात् त्याला हें पटलं नसेल असं नाहीं, पण साहित्यशास्त्रांतील संकेतांची बूज राखण्यासाठींच त्यानं बुद्धयाच हा दोष पत्करला असावा असा माझ्या मार्मिक टीकाकार मित्राचा अभिप्राय आहे; त्यावर विश्वास ठेवतांना मला अवघडल्यासारखं कां वाटावं ! लोकप्रियतेच्या गिरीशिखरावर एकाकाळीं विराजमान झालेला हॉलकेन्सारखा कादंबरीकार आज स्मृतिशेष होऊन रहावा या अघटिताच्या मूळाशींहि हेंच कटु सत्य दडलेलं नसेल का ? स्टिफन्

झ्वाईग डॉस्टव्हस्की किंवा मॉम् यांनीं आपापल्या ललित कथांतून ज्या पुरोगामी वृत्तीनं लोकांना नवीं जीवनमूल्यं अर्पण केलीं तिचा हॉलकेनच्या कादंबऱ्यांत कुठं आढळ होतो ? हजारो, लाखों रसिकांच्या मनावर ज्या ग्रंथकारांनीं शतकानुशतकं प्रभुत्व गाजवलं आहे त्यांच्या असाधारण यशाचं बीज त्यांच्या बंडखोरींत, त्यांच्या प्रतिकारशक्तींत, त्यांच्या अभिनव मतप्रणालींत आढळून यावं हेंच स्वाभाविक वाटतं ! आत्मोद्धाराची मर्यादा फक्त उच्चवर्णीयांपुरतीच संकुचित करणाऱ्या प्रत्यक्ष वेदांनाहि कृपण ठरवून, मोक्षाचा मार्ग स्त्रीशूद्रादिकांनाहि मोकळा असल्याची उद्घोषणा करणारा, ब्रह्मविद्या प्राकृतांत आणूं नये हा धर्माच्या वतनदारांनीं निर्माण करून ठेवलेला दंडक झुगारून देऊन लोकभाषेंत त्या विद्येचा 'सुकाळ' करून सोडण्याचं प्रतिज्ञाकंकण बांधणारा ज्ञानेश्वर नि त्याच्याच योग्यतेचे तुकाराम एकनाथादि संतश्रेष्ठ यांची युयुत्सु क्रान्तिकारक वाणी काव्यरूपानं अमर ठरावी यांत नवल कोणतं ?

महर्षि अण्णासाहेब कर्वे, शंकरराव देव, डॉ. मुंजे इत्यादि आधुनिक राजकारणी नि समाजसुधारक संतांनीं लोकगंगेच्या प्रवाहाबरोबर वाहत न जातां भगीरथाच्या निश्चयानं तिलाच आपल्यामागं आणण्याचा जो अभूतपूर्व विक्रम करून दाखविला त्यांतील यशस्वितेचं मर्म त्यांनीं वाढवलेल्या दाढींत आहे अशी आज माझी खात्री झाली आहे. गुळगुळीत चेहरा म्हणजेच शिष्टाचार या लोकभ्रमांना धक्का देऊनच त्यांनीं आपल्या बंडखोरीचा पहिला आविष्कार जगाच्या निदर्शनास आणून दिला नाहीं का ?

# अमृताच्या चुळा : : १०

' लेखक लिहितो जिवाभावानं, टीकाकार म्हणतो रद्दड, ' ही एका जुन्या सुभाषिताची नवी आवृत्ति वाङ्मयसृष्टींत रूढ करण्यास कोणतीच हरकत नाहीं !

साहित्यसृष्टींत टीकाकारांनीं प्रचलित केलेला ' रसग्रहण ' हा सामासिक शब्द मला षष्ठी तत्पुरुषापेक्षां चतुर्थी तत्पुरुषाच्याच जातीचा वाटतो ! लेखकाच्या कलाकृतीचं सौंदर्य झांकळून टाकणारी, तिला गिळायला उठणारी टीका म्हणजे तिला लागलेलं मुर्तिमंत ग्रहणच नव्हे तर काय ? कालिदासाच्या काव्याचं मर्म रसिकांना विशद करून सांगणाऱ्या मल्लीनाथाच्या संजीवनी टीकेचा एखाद दुसरा अपवाद वगळला तर बाकीच्या टीकाकारांचीं भाष्यं मोरचूत, बचनाग किंवा सोमल या नांवानंच ओळखलीं जायला हवींत असं माझं स्पष्ट मत आहे ! मॅथ्यू अर्नोल्ड, गटे, कोलरीज किंवा एडमंड गॉस या सहृदय टीकाकारांपेक्षां जॉनसन्, जेफ्रे आणि मंडळींशींच ज्यांचं अधिक जवळचं नातं सांगतां येईल असे ' धारकरी ' सांप्रदायाचे अनुयायीच दुर्दैवानं या जगांत पदोपदीं आढळून येतात !

" Kill him ! He is a reviewer ! " असा स्वेषाचा उद्गार गटेच्या तोंडून बाहेर पडला तो उगीच नाहीं ! बेंजामिन डिझरायलीनं

अशा प्रकारच्या छिद्रान्वेषकांना उद्देशून " A crytic is a failed poet" असा उपरोधिक टोमणा मारावा हेंहि स्वाभाविक वाटतं ! भवभूतीनं उत्तर-रामचरित नाटकाच्या प्रस्तावनेंत स्त्रियांचं चारित्र्य नि काव्याची थोरवी यांविषयीं दुर्जन नेहमींच साशंक असतात अशा आशयाची तक्रार केली ती कांहीं खोटी नाहीं. ' असल्या महाशयांना नुसतं दुर्जनच नव्हे तर अति दुर्जन म्हणावं ' ( नतु अति दुर्जन इति वक्तव्यम् ) असंहि त्यानं त्या नाटकांतल्या एका पात्राच्या तोंडीं वाक्य घातलं आहे ! अन् काव्याचे वाभाडे काढणाऱ्या असल्या निंदकांची विध्वंसक वृत्ति लक्षांत घेऊनच त्या महाकवीला ' ये नाम केचिदिह—' हा आर्त उद्‌गार मालती—माधव नाटकाची प्रस्तावना लिहितांना काढावा लागला हें सर्वांना ठाऊकच आहे.

माझाच अनुभव सांगतों. वि. स. खांडेकरांच्या संपादकत्वाखालीं सुरू झालेल्या ज्योत्स्ना मासिकानं एकदां लघुकथांची चढाओढ जाहीर केली होती. स्पर्धेसाठीं आलेल्या चारपांचशें गोष्टींत माझ्या कथेला दुसऱ्या क्रमांकाचं बक्षीस मिळालं तेव्हां माझ्या अनेक रसिक मित्रांनीं माझं हार्दिक अभिनंदन केलं. पण चिकित्सेच्या निमित्तानं चिरफाडीची हौस भागवून घेणाऱ्या एका टीकाखोरानं माझ्या त्या गोष्टीवर असा कांहीं प्रखर हल्ला चढविला होता कीं माझ्या ठिकाणीं एखादा हाडाचा साहित्यिक असतां तरी त्याचं ब्रेनफॅक्चर झाल्यावांचून राहिलं नसतं !

सदरहु टीकाकार महाशयांना माझ्या कथेंत आक्षेपार्ह काय आढळून आलं तर म्हणे, गोष्टीच्या शेवटीं तिच्यांतल्या विधवेचं काय झालं हें मीं सांगितलंच नाहीं ! विधवेचं काय झालं हें मी काय सांगणार ! कपाळ ! दगडाला ठेंच लागून मनुष्याला मृत्यु आल्याचा प्रसंग वाचल्यावर, ' पुढे त्या दगडाचं काय झालं ? ' असं कुतूहलानं विचारणाऱ्या चोखंदळ वाचकाच्याच जातीचा तो टीकाकार वाटला मला !

' हिंद ' मासिकाच्या लघुकथा चढाओढींत यशस्वी ठरलेली माझी दुसरी एक कथा अन् ' हंस 'च्या विनोदविषयक निबंधांच्या स्पर्धेत पहिलं

पारितोषिक मिळालेला निबंध यांच्या बाबतींतहि थेट हाच अनुभव आला मला.

पण परवां कुठंसा प्रसिद्ध झालेला माझा लघुनिबंध वाचून एका टीकाकारानं व्यक्तविलेल्या अभिप्रायाचा नमुना या सर्वांवर ताण करणारा होता !

या जगांत सुखी होऊं इच्छिणाऱ्यानं जीवनांत इतस्ततः विखुरलेले सुखाचे कण वेंचायला शिकायला हवं, आयतं भरलेलं सुखाचं ताट समोर वाढून येईल अशी कुणीहि अपेक्षा बाळगूं नये अन् तें तसं आलं तरी त्यांत फारसं स्वारस्यहि नाहीं, या मध्यवर्ती कल्पनेवर प्रस्तुत लघुनिबंधाची उभारणी केली होती. पण या विषयाबद्दल टीकाकारान आपली तीव्र नापसंती व्यक्त केली. त्याचं म्हणणं होतं, 'मी निबंधासाठीं निवडलेला विषय अगदींच शिळा होता ! आजपर्यंत शेंकडो लेखकांनीं मानवी सुख-दुःखांची मीमांसा केली आहे. पुनःपुन्हां शिळ्या कढीला ऊत आणण्यांत कोणता पुरुषार्थ आहे ?'

या आक्षेपावर मी उत्तर देणार तोंच मला बोलूं न देतां हे राजश्री म्हणाले, 'अन् खरी परिस्थिति अशी आहे कीं आमच्या पूर्वींच्या ऋषि-मुनींनीं आपल्या जीवनाबद्दलचा इतका कांहीं अनुभव नमूद करून ठेवला आहे कीं त्यापेक्षां अधिक, नवं असं कांहीं सांगायचं शिल्लकच राहिलं नाहीं ! 'व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम्' म्हणून म्हटलंय् तें उगीच नाहीं महाराज!'

वादाचा मूळ मुद्दा डावलून उलट आपणच जिंकली अशा मुद्रेनं माझ्याकडे पाहणाऱ्या त्या वावदुकाला हंसावं कीं रडावं हेंच मला समजेना. तथापि वादाला खेळीमेळीचं स्वरूप यावं म्हणून मी हंसत हंसत म्हटलं, 'सारं कांहीं व्यासांचं उच्छिष्ट असलं तरी मन परमेश्वराइतकं उदार असलं कीं, त्यांतहि त्याला गोडी वाटल्यावांचून रहायची नाहीं ! श्रीकृष्ण परमात्म्यानं शबरीचीं उष्टीं बोरं आवडीनं खाल्लींच कीं नाहीं ?'

त्या युक्तिवादानं अर्थातच त्याचं समाधान होण्यासारखं नव्हतं.

माझ्या निबंधाच्या विषयाच्या शिळ्या कढीनं बिघडलेली त्याची तब्येत अशी मुखासुखी थोडीच ताळ्यावर येणार होती !

पण कांहीं असो. त्यानं माझ्या निबंधावर केलेला शिळेपणाचा आरोप मी हंसण्यावारी नेण्याचा यत्न केला तरी तो निघून गेल्यानंतर राहून राहून त्याची टीका मला बेचैन करूं लागली. पाय मुडपल्यावर थांबून थांबून कळा निघ्यात ना ? अगदीं तश्शी !

गेल्या चार सहा महिन्यांत मी लिहिलेल्या कांहीं लघुनिबंधांचे विषय मनाशीं आठवून त्यांच्या नवेजुनेपणाची शहानिशा करूं लागलों—

—व्यवहारांत वागतांना मनुष्यानं आपल्या स्वभावाला थोडी तरी मुरड घातली पाहिजे, प्रसंगीं दुसऱ्याच्या कलानं घेण्यांतच त्याचं हित असतं—

––स्वतः कांहींहि कृति न करतां पूर्वजांच्या पराक्रमाचे पोवाडे गाणं मूर्खपणाचं लक्षण आहे––

––काव्याचा आत्मा औचित्य असावा या एका संस्कृत साहित्य-शास्त्रकाराच्या मताशीं इतरांनीं मतभेद दर्शविला असला तरी जीवनाचा आत्मा औचित्य असायला पाहिजे याविषयीं कुणाचंहि दुमत होणार नाहीं––

भराभर निबंधांचीं नांव अन् त्यांचे विषय आठवूं लागलों पण अभिनवतेचं शिक्कामोर्तब करतां येईल असा एकहि विषय त्यांत मला आढळून येईना ! कुणी ना कुणी तरी त्या विषयांचा परामर्ष घेतला असल्याची मन ग्वाही देऊं लागलं !

ते तीन चार दिवस मोठ्या अस्वस्थ मनःस्थितीतच गेले माझे ! जवळ जवळ एक हजार पृष्ठं भरतील इतकं वाङ्मय लिहून नि प्रसिद्ध करूनहि नवनिर्मितीच्या श्रेयाला मात्र आपण पारखं असावं ही गोष्ट तीव्र शल्याप्रमाणं मला रात्रंदिवस टोंचूं लागली.

‘ व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम् ’ हा वाग्बाण टीकाकाराच्या भात्यांतून

प्रथम ज्या क्षणीं सूं सूं करीत सुटला असेल तेव्हांपासून आजपर्यंत अनेक साहित्यिकांचे आत्मे त्यानं विद्ध झाले असतील-- भारवी, दंडी, माघ यांच्यासारखे महाकविसुद्धां याला अपवाद राहिले नसतील हा विचार मनांत येऊन मला वाईट वाटलं. तसं स्वतःच्या दुःखांत अनेक वांटेकरी असल्याच्या जाणिवेनं हायसंहि वाटलं !

कालिदासाचं शाकुंतल, हर्षाचं नैषध, माघाचं शिशुपालवध या साऱ्या विदग्ध काव्यांना महाभारतांतल्या आख्यानोपाख्यानाचा आधार असल्यामुळं एका दृष्टीनं तीं उष्टींच म्हणूं नयेत तर काय ?

पण दुसऱ्याच क्षणीं माझं मलाचं हंसूं आलं ! टीकाकाराच्या आरोपांत तथ्य मानणारा केवढा खुळा म्हणायचा मी !

कविप्रतिभेकडून नाविन्याची अपेक्षा करतांना रसिकांनीं सारासार विवेक दाखवायला नको का ? साहित्यिक हे वाक्सृष्टीचे विधाते खरे, तथापि निसर्गाच्या नियंत्रणा सर्वस्वी धाब्यावर बसवून नव्या नियमांचं, नव्या संकेतांचं; स्वतंत्र असं वाङ्मयविश्व ते निर्माण करूं शकतात असा त्यांच्याविषयीं विश्वास बाळगणं अज्ञानाचं द्योतक नाहीं का ?

जगाच्या प्रारंभापासून आजतागायत यच्चयावत ललना आपल्या प्रियकरांना विशिष्ट, ठराविक विभावाअनुभवादि चेष्टांनीं आकृष्ट करीत आल्या आहेत. पण प्रत्येक वेळीं रमणींच्या त्या लीलांत कामीजनांना एक नवी, अभूतपूर्व अनुभूति गवसल्याचा आनंद लाभत नाहीं का ? प्रेयसींच्या हावभावांत, कमनीय अंगविक्षेपांत त्याला क्षणाक्षणाला प्रीतीच्या ज्या नवनव्या उन्मेषांचं दर्शन घडतं त्याच अर्थानं कविप्रतिभेलाहि नवनवोन्मेषशालिनी हें विशेषण बहाल करण्यांत औचित्य नाहीं का ? कालिदासादि विदग्ध कवींनीं रामायण महाभारतासारख्या आर्ष काव्यांच्या आधारानं आपापल्या ललित कृति रचल्या खऱ्या पण केवळ याच कारणानं त्यांच्याकडे दूषित दृष्टीनं पाहणं म्हणजे ताजमहालची उभारी पायांत दगड रचविणाऱ्या मजु-

रांच्या परिश्रमामुळं होऊं शकली या सबबीवर त्याच्या कारागिरांना शिल्पचातुरीचं श्रेय न देण्याइतकंच असमजसपणाचं नाही का ?

' परिसाला लोखंडाचं सोनं करतां येत असेल, पण त्याच्या किमयेला आधारभूत असलेलं लोखंड त्याला कुठं बनवितां येतं ! ' असं वादंग घालून नाक मुरडणाऱ्या असंतुष्ट आत्म्यांचं परमेश्वरच समाधान करूं जाणे ! बाकी महाभारतांतल्या कथानकांची उसनवारी करूनहि कालिदासादि कविश्रेष्ठांनं त्यांच्यांत आपल्या असामान्य प्रतिभासामर्थ्यानं किती आल्हाददायकत्व ओतलं आहे हें त्या कृति प्रत्यक्ष पाहिल्यानंच समजणार आहे.

रामायणाचं नैतिक अन् भारताचं बौध्दिक युग मागं पडल्यावर ज्या भौतिक युगाला सुरवात झाली त्याचे विशेष घेऊनच विदग्ध काव्यं जन्माला यावीं हें सहाजिक नव्हतं का ? शास्त्र,विद्या, कला यांच्या बाबतींत सुधारणा झालेल्या कालखंडाचं त्यांत प्रतिबिम्ब उमटणं अपरिहार्य नव्हतं का ? भाषा, कथनपद्धति इत्यादि साऱ्याच बाबतींत प्रकट झालेली विदग्ध कवींची सुसंस्कृत, व्यापक आत्मनिष्ठा हें त्यांच्या काव्यांचं नवं लेणंच नव्हतं का ? वस्तुनिष्ठ, आर्ष कवींच्या साध्या, निरागस, सरळ निवेदनशैलीऐवजीं चातुर्य, पाटव नि नागरपण यांचं दर्शन घडविणारी, स्थूल प्रसंगांऐवजीं प्रसंगांतल्या सूक्ष्म तत्त्वांत रमणारी, हेतुपुरःसरपणें शब्दालंकार व अर्थालंकार यांची योजना करणारी, सहजावस्थेंतील कामप्रवृत्तीऐवजीं मधुपान, सुरतोत्सव इत्यादि प्रसंगांच्या द्वारें शिष्टमान्य शृंगाररसाचा परिपोष करणारी विदग्ध कवींची प्रतिभा नाविन्याची निदर्शक नव्हती का ? त्यांच्या काव्यांतलीं हीं स्थित्यंतरं म्हणजे बदलेलल्या सामाजिक मनाशीं समरस पावणाऱ्या स्वतंत्र प्रज्ञेची साक्षच होती, याबद्दल मला बिलकूल शंका वाटत नाहीं।

आद्य कवीनं रेखाटलेला दशरथाचा भावविवश स्वभाव नि कालिदासानं चित्रिलेला संयमशील स्वभाव, एकानं विस्तारानं वर्णिलेला सीतेविषयींचा शोक तर दुसऱ्यानं केलेला त्याच विषयाचा संक्षेप, धर्म-

मोक्षाच्या कल्पनेवर भर देऊन कौरवांच्या बाबतींत स्वीकारलेल्या अगतिकतेचं समर्थन करणारा व्यास महर्षींचा, युधिष्ठीर आणि अर्थकामाच्या उपेक्षेमुळं द्रौपदीनं केलेल्या निर्भत्सनेनं लज्जित झालेला भारवीचा युधिष्ठीर, हीं सारीं उदाहरणं कलावतांच्या अभिजात कलात्मकतेचा निर्वाळा देण्यास पुरेशीं आहेत.

कलानिर्मितींतली हीच पृथगात्मता मराठी काव्यांतहि दृग्गोचर झाल्याशिवाय राहत नाहीं. एकनाथ, मुक्तेश्वर, मोरोपंत यांनीं महाभारताच्या आधारावर आपल्या काव्यांचे इमले उठवूनहि त्यांत प्रकट झालेली त्यांची वास्तुकला आपापल्या परी स्वतंत्र नि स्वयंपूर्ण वाटते. देवांच्या अमृताच्या चुळा झेलून अमरत्व पावणाऱ्या अशोक वृक्षाप्रमाणं त्यांची कला चिरंजीव झाली आहे ! ' प्रतिक्षणे यन्नवतामुपैति ' हें प्रतिभेबद्दल कधीं कधीं केलं जाणारं विधान केवळ साहित्यापुरतंच लागू पडतं असं नाहीं. नृत्य, शिल्प, चित्र, नाट्य, संगीत इत्यादि सर्वच कलांत प्रतिभेचं हें अभिनव निर्मितीचं ब्रीद, अपूर्व वस्तु निर्माणक्षमतेचं वैशिष्ट्य कायम असतं !

सौभद्र नाटकाचे प्रयोग आजवर थोड्याथोडक्या कां नाटक कंपन्यांनीं केले आहेत ? दहा बारा कंपन्यांचा तरी हा खेळ मीं पाहिला असेल. पण बालगंधर्व, शंकरराव सरनाईक, मास्टर नरेश, हिराबाई बडोदेकर, प्रमिला जाधव, यांपैकीं प्रत्येकाची सुभद्रेची भूमिका निरनिराळ्या वैशिष्ट्यामुळं माझ्या लक्षांत राहिली आहे. भीति, लज्जा, अनुराग, विनय, रोष इत्यादि स्त्रीमनाच्या गुणधर्मांपैकीं एखाद्या गुणाचा प्रकर्षानं आविर्भाव करून प्रत्येकानं त्या भूमिकेवर ' स्वत्वा ' चा घसघशीत ठसा उमटविला आहे !

हाच संगीताच्या क्षेत्रांतहि मला कैक वेळां अनुभव आला आहे. ' ऐसी ना मारो पिचकारी ' ही ठुमरी मी कमींतकमी तीस चाळीस वेळां तरी प्रसिद्ध अप्रसिद्ध गायकांच्या तोंडून ऐकली असेल. यौवनसुलभ मोहविवशता अन् सामाजिक बंधनं यांच्या कैचींत सांपडल्यामुळं होणारी

एका तरुण, सासुरवाशीण स्त्रीच्या मनाची द्विधा, अगतिक, असहाय अवस्था केवळ ललित, मधुर स्वरांच्या सहाय्यानं श्रोत्यांच्या प्रत्ययाला आणून देण्याचं अपूर्व कसब म्हणजे गाणाऱ्यांच्या व्यक्तिगत स्वरप्रतिभेचा मनोज्ञ विलास तर खराच, पण त्यांतहि निरनिराळे कलावंत स्वरास्वरांत ज्या कांहीं तरल, सूक्ष्म भाव छटा नादलोलुपांच्या प्रतीतीस आणून देतात त्यांचं वर्णन लेखणीनं काय करावं ? मास्टर कृष्णरावांच्या शद्बोच्चारांतला तो नखरेबाज लाडीकपणा, सुरेशबाबूंच्या आलापींतली आर्जवी व्याकूळता, बाबूराव वडगांवकर नांवाच्या माझ्या एका मित्राच्या कंठांतल्या अल्लड, नाजुक मुरक्या... इतक्या विविध अनुभूतींचा आस्वाद घ्यायला लावणारी गायकांची कलात्मकता अभिजात, स्वयंभू समजू नये का ?

आणि मग माझ्या लघुनिबंधाच्या विषयासंबंधीं त्या टीकाकारानं घेतलेल्या आक्षेपांत तरी मी तथ्य कां मानावं ?

फार तर प्रतिभेचं स्वतंत्र अस्तित्व जाणवण्याइतकी माझ्या हातून लेखनतपस्या घडली नाहीं हा त्यांतून मी निष्कर्ष काढूं शकेन. पण व्यासानंतर कोणत्याच लेखकाच्या प्रतिभेला स्वतंत्र अस्तित्व उरलं नाहीं हें विधान मान्य करण्याइतका मात्र मी खास निराशावादी नाहीं !

उष्ट्या पत्रावळी कां होईनात, पण त्या गोळा करून त्यांतूनहि आपण कवित्वाची कळा प्रकट करूं शकलों असं सांगणाऱ्या तुकोबांच्या ठिकाणीं विनयाइतकीच काव्य शक्तीविषयीं निष्ठाहि नव्हती का ?

# धृतराष्ट्राची साक्ष : : ११

गळ्यांतल्या पुष्पहाराच्या सुगंधानं—यशोगंधानंच म्हणायला हवं खरं म्हटलं तर—रघुनाथच्या वृत्ति मोहरून जावयास हव्या होत्या. दोन वर्षांपूर्वी त्यानं सोनगांवला स्थापन केलेल्या शाळेंत आज नाहीं म्हटलं तरी चाळीस पन्नास मुलं शिक्षण घेत होती. केवळ परोपकारबुद्धीनं त्यानं चालविलेल्या या कार्याबद्दल त्याच्याविषयीं कृतज्ञता व्यक्तविण्याच्या हेतूनं गांवकऱ्यांनीं त्या दिवशीं मुद्दाम सत्कारसमारंभ घडवून आणला होता. पण रघुनाथचं लक्ष कांहीं केल्या सभेतल्या भाषणाकडे लागेना !

जाणूनबुजून खेडेगांवांतल्या वक्त्यांचे वाक्स्रोत ते ! धबधब्याच्या गांभीर्यापेक्षां छत्रींतून गळणाऱ्या धारांचा विनोदच जिथं प्रतीत झालेला आढळून यायचा तिथं रघुनाथासारख्या सुसंस्कृत तरुणाला कसलं आकर्षण वाटणार ?

गांवांतले अज्ञानाचे डांस मारून टाकणारा 'पॉयझा' म्हणून त्याचा कुणी उल्लेख केला होता, कुणी त्याला विद्यार्थ्यांना नवी ज्ञान-दृष्टि देणारं गुलबकावलीचं फूल ठरविलं होतं, तर कुणी निरक्षरांच्या वाटेवर विद्येची खडी पसरून तिचा पक्का रोड बनवणारा रोलर म्हणून त्याचा निर्देश केला होता...

इतर कोणत्याहि व्यवसायापेक्षां शिक्षकाला आपल्या क्षेत्रांत तोंडाची

वाफ अधिक प्रमाणांत दवडावी लागते, हें लक्षांत घेतां रघुनाथाला वाफेच्या कळांची उपमा देणाऱ्या त्या वक्त्याच्या नटी प्रतिभेचं त्यानं कौतुक करा-यास हवं होतं.

पण त्यानं एकदां खुर्चीत बसल्यावर जी खालीं मान घातली ती साऱ्या वक्त्यांचीं भाषणं संपेपर्यंत !

' शहाण्याकडून व्हावा निषेध, पण मूर्खांकडून होऊं नये सत्कार ' असं एका रूढ सुभाषिताच्या चालीवर दुसरं एखादं नवं रचण्याच्या उद्यो-गांत तो गढला होता कीं,......

छे: ! छे: ! वाकळीत शालीचं सौंदर्य नसलं म्हणून तिच्यातली ऊब जाणवल्याशिवाय थोडीच राहते ?

सोनगांवकराच्या भाषणांत अलंकारशास्त्राचा पत्ता नसेल, व्याकर-णाचा मागमूस नसेल, पण त्यांच्या अशुद्ध उच्चारांत, ग्रामीण शब्दांत अन् मोडक्या तोडक्या वाक्यरचनेंत केळीच्या रसरशीत गाभ्यासारखा जिव्हाळा प्रकट झाला होता, तो रघुनाथच्या लक्षांत आल्याशिवाय कसा राहील ?

मग त्याचं मन त्या भाषणांत न रमायला दुसरं कोणतं कारण घडलं होतं ? निद्राधीन होतांना अर्ध्या मिटल्या डोळ्यांना खोलींतील वस्तूंचं पुसट अस्तित्व जाणवावं त्याप्रमाणं गांवकऱ्यांचीं भाषणं नुसतीं त्याच्या कानांवरून जात होतीं. पुढं पुढं तींहि त्याला ऐकूं येईनाशीं होऊन कोणत्या तरी अज्ञात शक्तीचे शब्द त्याच्या कर्णरंध्रांत घुमूं लागले—

' खुळा आहेस झालं ! तुझ्या कलासक्त, रसिक, सौंदर्यपिपासू मनाला बे एके बेचे धडे देण्यापायींच कां तूं जन्मभर राबणार आहेस ? तुझ्या बुद्धिमत्तेच्या अन् प्रतिभेच्या विकासासाठीं सोनेगांवची खडकाळ भूमि तूं कुठून पसंत केलीस ? साक्षरताप्रसाराचं कार्य कोणाहि सामान्य कुवतीच्या माणसाला करतां येईल. पण मरूं घातलेल्या मराठी रंगभूमींत नवचैतन्य उत्पन्न करायला तुझ्यासारख्यांचीच आवश्यकता आहे...तुझ्या

प्रतिभेच्या संजीवक स्पर्शानं रंगभूमि एकदां खाडखाड बोलूं लागली म्हणजे तिच्याकरवी हवे ते धडे तूं समाजाला दे... '

इतक्यांत एका मोटारीच्या कर्कश शिंगानं दचकून तो भानावर आला. चुनाविटांनीं भरलेली एक मोटरलॉरी त्याच्या गाडीला मागं टाकण्याचा प्रयत्न करीत होती.

हो, त्यावेळीं तो कॅडेलरोडवरून आपली नवी कोरी गाडी हांकीत होता. पुष्पमालेऐवजीं कांचनमालेचा मृदु करपाश आपल्या गळ्याभोंवतीं असल्याचं त्याच्या लक्षांत आलं. तिनं केसांना लावलेल्या कोणत्याशा विलायती तेलाचा मंद मधुर सुवास त्याच्या नाकाभोंवतीं दरवळत होता.

...चार वर्षांपूर्वीं सोनगांवच्या लोकांनीं आपल्या कंठांत घातलेला फुलांचा हार...आज कांचनमालेच्या रूपानं, साक्षात् कलेनं आपल्या गळ्याभोंवतीं टाकलेला नाजुक...काल्च्या आयुष्यांत सायंकाळची रमणीयता होती, आजच्या आयुष्यांत उषेची दिव्यता आहे...आपल्या मनःसृष्टींतल्या अनेक कळ्यांचं उन्मीलन ' आजच्या ' उषःकालींच व्हायचं आहे...

गतायुष्याची वर्तमानाशीं तुलना करतां करतां रघुनाथ कांचनमालेच्या चेहऱ्याकडे अनिमिष नेत्रांनीं पाहूं लागला.

' इश्श ! इतकं टक लावून पहायला...'

' हरिणाची शिकार साधण्यापूर्वीं टक लावून पाहत बसावं लागतं, पण माणसाची शिकार हातीं लागल्यावरच तिच्यावर डोळे खिळून बसतात ! '

' वा : ! तुमच्या नव्या नाटकांत छान खुलेल कीं, हें वाक्य ! खरंच, घाला गडे, अं !—'

असं म्हणतांना कांचनमाला त्याला अधिकच रेलून बसली. तिच्या मांसल, मोन्यापान दंडाच्या कोष्ण स्पर्शानं अंगभर विद्युल्लहरी थरारून [illegible] त्याला विलक्षण भास झाला.

पोर्तुगीज चर्चजवळ उजवीकडे गाडी वळवीत असतां कांचनमाला त्याला म्हणाली, ' हें काय ! एवढ्यांतच सोडणार वाटतं आम्हांला बंगल्या-वर ? आज जुहूला खाना घ्यायचा बेत केलाय् मी...अन् ज्योत्स्नाबाईना कंपनींतूनच मीं फोननं कळवूनसुद्धां ठेवलंय कीं, आज तुमचे यजमान घरीं उशीरां येतील म्हणून...'

' पण आज कापडखरेदीसाठीं आम्ही फोर्टमध्यें जायचं ठरविलं होतं. जुहूला जाऊ पुनः कधीं तरी—'

' अं हं ! फोर्टमध्यें पुनः कधीं तरी...' असं रघुनाथच्याच स्वराची नक्कल करून म्हणतांना कांचनमालेनं असं कांहीं लाडिक हास्य केलं कीं, तिची निराशा करण्याचं रघुनाथाच्या अगदीं जीवावर आलं ! तिच्या कोणत्याहि इच्छेंत मोडता घालण्याचं त्याला कधींच साधलं नाहीं. शुष्ककाष्ठांना पोखरणाऱ्या, पण कमलिनीच्या मृदु अवगुंठणांत बंदिस्त होऊन पडणाऱ्या भ्रमराविषयींचा संकेत अगदींच कांहीं काव्यसृष्टींतला नाहीं हें अशा वेळीं त्याला सहज पटे !

पण लगेच त्याच्या मनांत असाहि विचार येई, सुंदर स्त्रियांवर लुब्ध होऊन उल्लू बनणाऱ्या तरुणांच्या वर्गांत मात्र खास आपण मोडत नाहीं ! आपल्या नाट्यकलेच्या उत्कर्षासाठीं, रंगभूमीच्या उद्धारासाठीं, कांचनमालेसारख्या लहरी कलावंत स्त्रीच्या मर्जीप्रमाणं आपणाला वागावं लागतं...आपल्या नाटककंपनींतली मुख्य नटी म्हणून कांचनमालेचा आपल्या आयुष्यांत प्रवेश झाला नसता तर अवघ्या चार वर्षांत आपणाला नाट्यसृष्टींत इतकं यश, इतका पैसा मिळवितां आला असता का ?

आतां कांचनमालेच्या जुहूला चलण्याविषयींच्या आग्रहाला त्यानं जी मूक संमति दिली तिचं तो मनाशीं असंच कांहींसं समर्थन करूं पाहत होता. इतक्यांत एक वृद्ध स्त्री गाडीसमोर आल्याचं लक्षांत येऊन त्यानं चटकन् ब्रेक लावले. पण गाडीचा वेग कह्यांत येण्यापूर्वींच तिचीं दोन्हीं चाकं म्हातारीच्या पोटावरून गेलीं होतीं !

'च्! च्!' असं कळवळून उद्गार काढून रघुनाथ उजवीकडचं दार उघडून खालीं उतरणार तोंच त्याचा डावा दंड खसकन् मागं ओढीत कांचनमाला म्हणाली, 'वेड बीड लागलंय कीं काय? झटकन् वाट सांपडेल तिकडे पसार होऊं. नाहीं तर गाडीसकट पोलीसच्या स्वाधीन व्हावं लागेल!'

अपघाताच्या ठिकाणापासून गाडी बरीच दूर गेली तरी रघुनाथच्या दृष्टीसमोरून वृद्धेचा चेहरा ढळला नाहीं. वांद्र्याच्या खाडीवरल्या पुलावरून जातांना पश्चिमेकडून आलेल्या गार वाऱ्यानं कांचनमालेला शहारल्यासारखं झालं. पण रघुनाथला त्याची दखलहि नव्हती. इतकंच नव्हे तर त्याच्या कंपनींत दमयंती नांवाच्या एका येऊं घातलेल्या नटीचं ती सरभरीत वर्णन करीत होती, तिकडेहि त्याचं फारसं लक्ष लागलं नाहीं.

अपघाताच्या जागीं म्हातारीला तसंच तडफडत टाकून आपण पळून जायला नको होतं असं त्याचं मन त्याला पुन:पुन्हां सांगूं लागलं. साक्षात् जीवनाकडे पाठ फिरवून निर्जीव केलेला कवटाळणाऱ्या स्वत:च्या विकृत, भेकड कलात्मकतेची त्याला लाज वाटूं लागली...मोहक शब्दांची जादू पेरून समाजाची अन् स्वत:ची वंचना करणाऱ्या दांभिक वृत्तीची घृणा वाटूं लागली...

कांचनमालेच्या केशकलापाचा सुगंध येतांच त्यानं तिरस्कारानं दुसरीकडे तोंड फिरविलं. अंगावर जुनं विटकं पटकूर असलेल्या खेडवळ, अशिक्षित स्त्रींत जें जिवत नाट्य आढळतं त्याचा कांचनमालेसारख्या नाटकी स्त्रियांच्या जीवनांत शतांश हिस्सासुद्धां सांपडावयाचा नाहीं असं त्याला वाटलं!

पण कांचनमालेचा तिरस्कार करणाऱ्या मनाचं लगेच त्याला हंसूहि आलं!...धृतराष्ट्रसुद्धां मधून मधून कौरवांचा तिरस्कार करून पांडवांचे गोडवे गाई कीं! पण पंडुपुत्राविषयीं त्याला वाटणारी प्रीति दुबळी होती,

वरपांगी होती ! त्याचा खरा ओढा आपल्या कुपुत्रांकडेच होता. त्यागाबद्दल मनुष्याला वाटणारी आदराची भावनाहि अशीच क्षणजीवी, वरवरची असते; त्याची खरी माया भोगावरच जडलेली असते...आपल्या बाब-तींतहि याच कटु सत्याचा पडताळा येईल का ? कीं...

जुहूच्या हॉटेलांत सारी दुपार अन् सायंकाळ अशा उद्विग्न मनः-स्थितींत घालवून तो काळोख पडतां पडतां घरीं परतला.

कपडे काढतां काढतां ज्योत्स्नेला विचारलं, ‘ कुणी आलं होतं का ग ! ’

‘ हो, तान्या नांवाचा तुमचा तो सोनगांवचा विद्यार्थी आला होता, रात्रींच्या वर्गाला येत असे तो—बिचाऱ्याची आई मोटारीखालीं चेंगरून दगावली आज. त्याच्या बायकोला कुणी तरी फूस लावून मुंबईला पळवून आणलं म्हणे. इथं आल्यावर पहिलं नांव टाकून दमयंती या नांवानं ती वावरूं लागली. तिच्या शोधासाठीं दोघंहि इथं आले होते. पंधरा दिवस पायांच्या पाऱ्या केल्या दोघांनीं ! शेवटीं, बायको तर नाहींच आईहि गमावून आज निराशेनं तो गांवीं परत गेला. जाण्यापूर्वीं तुमचं दर्शन घ्यावं म्हणून आला होता. तासभर वाट पाहून गेला बिचारा...... ’

रघुनाथला गाडींतले कांचनमालेचे शब्द आठवले, पोर अजून कच्च्या दिलाची आहे. घटकेंत नवऱ्याकडे जायचं म्हणून हट्ट धरून बसते. देवानं इतकं सुंदर रूप अन् आवाज दिलाय तो काय गांवढ्या गांवांत मिरविण्यासाठीं ! तें कांहीं नाहीं. रघुनाथ, पांचशें रुपयांच्या मोटा तोंडावर टाकल्या कीं होईल बंद आपसूकच तें ! उद्या सकाळीं येतांना पांचशें रुपये घेऊन या...याल ना ?

यावर आपण काय उत्तर दिलं हें रघुनाथला स्मरेना.

त्याला वाटलं आत्ताच्या आत्तां कांचनमालेला फोनवर बोलावून

म्हणावं, ‘ वेडे, तान्यासारख्या एका निष्पाप, अजाण पोराच्या संसारांत विष कालवून काय मिळविणार आहेस तूं ? छेः ? छेः ! उद्यांच दमयंतीला सोनगांवला पाठवून दे...’

त्यानं थरथरत्या हातानं रिसीव्हर उचलला, नंबरांवरून तबकडी फिरविली आणि घोगऱ्या, निश्चयी आवाजांत म्हटलं, ‘ हॅलो ! कोण ? कांचनमाला ? हें पहा कांचन...कांचन...अं ’

पण पुढं त्याच्या तोंडून शब्द निघेना. कांचनमाला म्हणत होती, इश्श ! हें काय ? बोला ना —’

रघुनाथाच्या घशाला कोरड पडली, पाय लटलट कापूं लागले आणि पायांखालची जमीन सरकत असल्याचा विचित्र भास होऊं लागला !

तो जें कांहीं कांचनमालेला ऐकवणार होता तें किती भयंकर, किती अनपेक्षित होतं !—

‘...अन् उद्यांपासून तुझामाझा संबंध तुटला असं समज. तूं किती उलट्या काळजाची स्त्री आहेस हें आज कळलं मला ! ’ त्यानं दोन वेळां तीं वाक्यं मनाशीं उच्चारलीं.

‘ हें काय ? रघुनाथ, आज झालंय तरी काय तुम्हांला ? ’

‘ कांहीं नाहीं ग ! ’

नंतर ज्योत्स्नेला ऐकूं जाणार नाहीं इतक्या हळू आवाजांत तो म्हणाला, दुपारच्या त्या अपघातामुळं माझं लक्षच ठिकाणावर नव्हतं बघ. संध्याकाळीं तूं पांचशें रुपयांबद्दल कायसं म्हणत होतीस ना ? उद्यां सकाळीं तुझ्याकडे येईन...रागावूं नकोस अं ! ”

त्या रात्रीं स्वप्नांत तो बडबडत होता, ‘...धृतराष्ट्राच्या साक्षीनं

माझ्या जगाचा दुबळेपणा कशाला सिद्ध करूं पाहतोस ?... तुझ्यापुरती फार तर त्याची साक्ष उपयोगी पडेल...'

ज्योत्स्नेनं त्याचा खांदा हालवून विचारलं, 'स्वप्न पडलं वाटतं... ?'

'अं हं ! नव्या नाटकांतल्या वाक्याची जुळवाजुळव करीत होतों...तूं झोंप !'

प्रसिद्धी—अखंड भारत
दिवाळी-अंक १९४९

# शुभस्य शीघ्रं ! : : १२

प्रीतीच्या टिकाऊपणाबद्दल शेंकडों नव्याजुन्या कवींनीं दिलेल्या शिफारसपत्रांना सरळ समुद्राचा तळ दाखवावा असं सुरंगाला अलिकडे वाटूं लागलं होतं. त्यांनीं चंद्रसूर्यांच्या दीर्घजीवित्वाशीं प्रीतीच्या आयुर्मानाची केलेली तुलना पाहिली कीं तिचं मस्तक भणाणून जाई, आणि ती मनांत म्हणे, ' उचलली कल्पना अन् दडपली काव्यांत, असा खाक्या ठेवणाऱ्या या कविप्रभुंना म्हणावं, चंद्र-सूर्यांच्या आयुष्याची कशाला गोष्ट सांगतां ! म्युनिसिपालिटीच्या दिव्याइतकी तुमच्या प्रीतीची ज्योत मिणमिणली तरी पुष्कळ आहे ! ' जपानी खेळण्यांपेक्षांहि प्रेम हें अल्पजीवि, तकलुपी आहे असं तिचं स्वानुभवावरून मत बनलं होतं. लग्नानंतर थोड्याच दिवसांनीं उधळलेले अवतीभवतीचे संसारसुद्धां तिच्याच मताला पुष्टि आणीत होते.

तिच्या बंगल्याशेजारीं राहणारे ' टाहो ' मासिकाचे संपादक धा. य. मोकले यांनीं एक वर्षापूर्वींच डॉ. ढुंबरडे यांच्या मुलीबरोबर प्रीतिविवाह केला होता. पण ' टाहो ' मासिकांत छापलेल्या त्या प्रेमी युगुलाच्या फोटो-खालच्या अभिनंदनाच्या मजकुराचा टाईप मोकळा होण्यापूर्वींच त्यांची प्रीति खिळखिळी झाली होती. जगाला प्रत्येक अंकांतून ज्ञानामृताचे डोज देण्याच्या पवित्र अन् उदात्त ध्येयानं जवळ आलेले हे दोन जीव आतां वकिलामार्फत एकमेकांना नोटिसा देण्यांत गढून गेले होते !

मिश्रविवाह केल्यामुळं आंतरराष्ट्रीय कौतुकाचा विषय झालेल्या दुसऱ्या एका जोडप्याचा तिला चांगलाच परिचय होता. मिश्रविवाह हे समाजाच्या विषमज्वरावरलं प्रभावी 'मिक्श्चर' आहे असं एका देशभक्तानं या प्रसंगाला उद्देशून भाष्य केलं होतं. तर व्ह. फा. नंतर एका वर्षात तीन यत्ता पुऱ्या केलेल्या महाराष्ट्राच्या एका होतकरू शेलनं 'If mixmarriage (!) comes, equality far behind ?' (!) असा आशावाद प्रकट केला होता !

पण आपल्या विवाहाला समतेच्या अन् समाजसेवेच्या आगंतुक अधिष्ठानाऐवजी चोरट्या गांठीभेटीचं, गुप्त पत्रव्यवहाराचं अन् ओझरत्या स्पर्शसुखाचं सनातन, स्वाभाविक अधिष्ठान लाभलं आहे अशी दोघांचीहि खात्री होती.

पण अरेरे ! समोर वाढून आलेलं प्रीतीचं ताट द्रौपदीची स्थाली न ठरतां सहा आणेवाली राईसप्लेट ठरली, कंचनीच्या मंद पदन्यासाची प्रथम प्रथम आठवण करून देणारी प्रीति, मोहरमच्या दहाव्या तारखेला घातल्या जाणाऱ्या हैदोसधुल्लयाची जाणीव करून देऊं लागली, मुंबईच्या अपोलो स्ट्रीटचं पुण्याच्या मुंजाबाच्या बोळांत रूपांतर झालं, भ्रमराच्या मत्त गुंजारवांतून हलवायाच्या दुकानांतील माशांचं घोंघावणं जन्माला आलं !

तिच्या माहितींतले एक प्रोफेसर, रेशनिंग कचेरींतील इन्स्पेक्टर, सिनेमानट यांच्या प्रीतिविवाहाच्या डावांचाहि असाच फज्जा उडालेला तिनं पाहिला होता !

आणि या साऱ्यांच्या वैवाहिक जीवनाच्या अपयशाची ती स्वतःशीं मीमांसा करण्याचा यत्न करी तेव्हां तिच्या मनाचा गोंधळ उडे. दामावांचून काम पुरुषार्थसुद्धां संपादला जात नाहीं ही एका जुन्या म्हणीची सुधारून वाढविलेली मार्क्सवादी आवृत्ति तिला ठाऊक होती. पण ज्याच्या ज्याच्या वांट्याला प्रीतिविवाहानं वैफल्य आलं होतं त्या साऱ्यांच्या मस्तकावर लक्ष्मीनं वरदहस्त ठेवल्याचंहि तिला माहीत होतं.

मग त्या त्या उध्वस्त संसाराच्या कारणाचं मूळ कुठं शोधायचं ? इतरांचं राहोच पण लग्नानंतर अवघ्या वर्षा सव्वा वर्षाच्या आंतच कोसळूं पाहणाऱ्या तिच्या स्वतःच्या प्रीतिमंदिराच्या रचनेंतला दोषहि कांहीं केल्या तिच्या लक्षांत येईना. रेडीमेड कोट थोड्याशा ताणानेंहि ठिकठिकाणीं उसवावा त्याप्रमाणं तिच्या संसारवस्त्राचे टाके येवढ्याशा हिसक्यानेंहि ढिले होत होते; जन्मतःच रोगट निपजलेल्या मुलानं उठल्या बसल्या चिरचीर करावी त्याप्रमाणं तिची प्रीति वेळीं अवेळीं किरकिरूं लागली; कच्च्या मडक्याला चोहोंबाजूंनीं गळती लागावी त्याप्रमाणं तिच्या प्रीतीचा मधुघट ठिबकून ठिबकून रिता होऊं लागला.

तसं पाहिलं तर रूप, बुद्धिमत्ता अगर रसिकता या गुणांच्या बाबतींत सुरंगा किंवा मनोहर यांपैकीं कुणालाच कांहीं कमी नव्हतं. एकमेकाला क्षणभरहि विसंबून राहण्याची कल्पना दोघांना दुःसह वाटे. नीट जुळवून ठेवलेल्या तंतुवाद्याच्या एखाद्या तारेवर आघात होतांच तरफेच्या तारांनींहि त्याच स्वराचा साद द्यावा त्याप्रमाणं दोघांच्याहि जीवनस्वरांत सुसंवादित्व निर्माण झालं होतं. मग अलीकडेच त्यांच्या संसारांत बदसूर संगीत कां उत्पन्न होऊं लागलं ?

गेल्या तीन चार दिवसांत सुरंगानं हाच प्रश्न स्वतःला किती तरी वेळां विचारला असेल पण तिला त्याचं उत्तर सांपडलं नाहीं. एखाद्या चेटकिणीनं जादूटोणा करून मनुष्याच्या सुखांत विष कालवावं त्याप्रमाणं तिच्या संसाराला एकदम विकृत कळा आली होती.

स्वतःच्या मालकीचा टुमदार बंगला, त्याच्या सभोंवारची टव-टवीत बाग, बैठकींतलीं सुंदर सुंदर चित्रं, कोपऱ्यांतल्या स्टुलावर मांड-लेला नाजुक बनावटीचा रेडिओ इत्यादि गोष्टींत तिचं मन आतां रमे-नासं झालं.

भव्य आरशासमोर बसून वेणी घालतांना तिला आपली सौंदर्य-प्रसाधना रसशून्य कवितेंतल्या गणमात्रादि जुळणीच्या खटाटोपासारखी

वाटे. प्राणहीन कुडीवर फुलांच्या माळा चढवाव्यात त्याप्रमाणं प्रीतिशून्य जीवनांतला साजशृंगार भयाण, औचित्यहीन वाटे !

आणि त्याच वेळीं तिच्या मनांत अशीहि विचित्र लहर येई, समोर पडलेल्या सौंदर्यप्रसाधनाच्या साऱ्या वस्तु लाथाडून द्याव्यात, पाठीवर मोकळे सोडलेले केंस तसेच राहूं द्यावेत अन् दूर जाऊन, मोठ-मोठ्यानं ओरडून जगाला–प्रेमाचे गोडवे गाणाऱ्या मूर्ख कवींना अन् लेखकाना–उद्देशून म्हणावं, बस करा हीं प्रेमाचीं फाजील–स्तुतिस्तोत्रं ! आजपर्यंत त्याच्या शाश्वतीविषयीं अन् सच्चेपणाविषयीं थापा मारल्यात तेवढ्या पुरे झाल्या. मीं अन् माझ्यासारखे शेंकडों दुर्दैवी स्त्रीपुरुष कंठ-रवानं आपला अनुभव तुमच्या कानांवर घालतील तो ऐका अन् यापुढें फसव्या प्रेमाचा उदो उदो बंद करा...'

बाळाजीतनय, सत्यभामाकान्त, सोनोपंतानुज, बापूरावाग्रज इत्यादि कविरायांची रांगच्या रांग तिच्या अंतःश्चक्षूसमोर उभी राही आणि त्या सर्वांनाच एकदम धडापासून वेगळं करण्याची चमत्कारिक पण प्रामाणिक इच्छा तिच्या अंतःकरणांत बळावे !

विशेषतः कवि लोअरपरळनिवासीच्या लांब, राकट झिंज्या ओढून, त्याला गदगदां हलवून काव्यसमाधींतून जागं करावं असं तिला राहून राहून वाटे.

सुरंगाच्या लग्नापूर्वी तिच्या प्रीतीच्या वर्षावाच्या अपेक्षेनं जे चार दोन चातक चोंच वासून बसले होते त्यांपैकींच कवि लोअरपरळनिवासी हा एक होता. नक्षत्र कोरडं गेल्यावर बाकीच्या चातकांच्या चोंची आपो-आपच मिटल्या होत्या पण कंठाला शोष लागलेला लोअरपरळनिवासी तसाच अशाळभूतपणानं आ वासून बसला.

सुरंगा शरीरानं दुसऱ्याची झाली तरी मनानं आपलीच आहे अशा काव्यमय तंद्रींत ऊर्फ मूर्खपणाच्या समजुतींत स्वारीनं गेल्या वर्षा दीड वर्षांत 'स–' 'ला–,' 'ते–' अशा निरनिराळ्या शीर्षकाखालीं

नऊ फटके, पांच कटाव, चार पाळणे आणि बऱ्याच पांडवादिडक्या प्रसिद्ध केल्या होत्या. ' डोळ्यांमध्यें गे तुझ्या साजणी खूण पाणी, तसें देख नाका-मध्यें—त्या मोरणीऱ्या लड्याचें किती तेज फांके आहाहा......' अशा कांहीं ओळी वाचतांना तिची क्वचित् प्रसंगीं करमणूक होत असली तरी एकंदरीनं लोअरपरळनिवासीच्या हातीं सांपडलेलं काव्यकोलीत तिच्या अंगाचा दाह करायलाच कारणीभूत होत असे.

तिचा हा दाह तीव्र व्हायला त्या दिवशीं विशेष कारण घडलं होतं. ठिकठिकाणीं तडे गेलेल्या तिच्या प्रीतीचे त्या दिवशीं तुकडे तुकडे होऊन तिचं अस्तित्व कायमचं मिटलं होतं. अन् त्याच दिवशीं, ' मरेल जग, त्या परी पुरानि प्रीत ही राहिल ' या चरणानं सुरुवात होणारी लोअर-परळनिवासीची कविता एका मासिकाच्या अंकांत छापून आलेली तिच्या दृष्टीस पडली होती !

पण गमंत ही कीं कविमहाशयाच्या प्रतिभेचे आचरट उन्मेष पाहून तिला प्रथम संताप आला असला तरी नंतर बिचाऱ्याची कींव वाटूं लागली. प्रीतीपासून चार पावलं दूर उभं राहिल्यावर कुणालाहि तिच्या ठिकाणीं मोहकता असल्याचा भास होणार, लग्नापूर्वी मनोहरला, आपणालासुद्धां, प्रीतीनं अशीच भुरळ घातली होती; पण अनुभवानं आतां दोघांनाहि कळून चुकलं कीं प्रेम हें थोतांड आहे, खूळ आहे.

ज्या कटु प्रसंगानं प्रीतीचा फोलपणा तिच्या पुरेपूर प्रत्ययास आणून दिला होता तो तिच्या दृष्टीपुढं तरळूं लागला.

दुपारीं जिभेवर पहिला घांस ठेवतांच मनोहर उसळून म्हणाला होता, ' हा काय स्वयंपाक कीं स्वयंपाकाची थट्टा ! आमटीला कडवट चव येतेय्...'

सुरंगाच्या जिभेच्या अगदीं टोंकावर शब्द आले होते, ' माग-

साला ताप आला म्हणजे अन्न कडू लागतं; संताप आला म्हणजे सारा संसारच कडवट वाटूं लागतो...'

' भाजींत मीठ कमी आहे. ' मनोहरनं दुसरी फैर झाडली.

' मनांतून उतरलेल्या माणसाचं मीठ अळणी लागतं हा कांहीं नवा शोध नाहीं ! ' सुरंगा ओंठांतल्या ओंठांत पुटपुटली.

' भाताला वाफ येऊं दिली नाहीं...'

' येवढी तोंडाची वाफ सुटलीय कीं ! घ्यावा त्यावर शिजवून भात...' सुरंगा स्वगत कुरकुरली.

दोघांच्या भांडणांत एका पक्षानं धारण केलेला थंडपणा पाण्याचा नसतो, स्पिरीटचा असतो ! प्रतिपक्षाच्या मनांतली क्रोधाची आग भडकवा-यलाच तो बहुधा कारणीभूत होत असतो. सुरंगाकडून एकदांहि प्रत्युतर न आलेलं पाहून मनोहर अधिकच चिडून म्हणाला होता, ' आतां दांतखिळी बसलीय अन्... '

' अधिकउणं बोलायची कांहीं जरूर नाहीं, सांगून ठेवतें ! '

' असं काय ? '

असं म्हणून मनोहर फणकाऱ्यानं पानावरून उठून गेला होता.

त्याच्या उद्गारांत कोणता अभिप्राय भरला होता हें कळायला सुरंगाला फारसा अवधि लागला नाहीं.

अन्नाची तशीच झांकपाक करून ती उपाशी पोटीं बैकठींत गेली तेव्हां मनोहरला झोंप लागली असून त्याच्या उशाजवळच्या स्टुलावर एक पत्र पडलेलं तिला आढळून आलं.

पाऊल न वाजवतां तिनं तें चटकन् उचलून वाचावयास आरंभ केला.—

ति. मामासाहेबांस सा. न. वि. वि.

' माझं हें शेवटचंच पत्र आपणांला येत आहे असं समजा. तुमच्या मुलीयांतला ऋणानुबंध इतक्या लवकर तुटेल अशी मला कल्पना नव्हती—

आपणालाहि नसेल. परमेश्वरालासुद्धां मानवी जीविताच्या ग लघुकथेंत अपेक्षाभंगाचंच तंत्र वापरण्याची हौस आहे कीं काय कुणास ठाऊक ! नक्षत्रासारख्या एकापेक्षां एक सरस मुली सांगून आल्या असूनहि मीं सुरंगाशींच विवाह लावला तें केवळ तिच्यावरील प्रेमामुळं. तिचं सौंदर्य दहाजणींसारखं असलं तरी तिच्या असामान्य बुद्धिमत्तेनं. अस्खलित वक्तृत्वानं मला भुरळ घातली. पण कॉलेजमध्यें असतांना तिच्या ज्या ओघवती वाणीची कानांना परवल वाटत होती तीच थोड्या दिवसांनीं कानठळ्या बसण्याइतकी कर्कश ठरली ! उठल्या बसल्या सुरंगा माझ्याशीं भांडूं लागली आणि आमच्या संसाराला पानीपतची अवकळा आली !...'

शब्दागणिक सुरंगाच्या हृदयांतली संतापाची भावना तीव्र होऊन तें जोरजोरानं धडधडूं लागलं, श्वसनाचा वेग वाढला आणि ओंठ थरथरूं लागले. उरलेल्या मजकुरावर धांवती नजर फिरवितांना 'तुम्ही आपल्या लेकीला पुनः माझ्याकडे पाठविण्याची तसदी घेऊं नका' हें वाक्य तीक्ष्ण कट्यारीसारखं तिच्या काळजांत घुसलं !

स्टुलावर पत्र टाकून ती व्यथित, संत्रस्त नि क्षुब्ध मनानं बैठकी-बाहेर आली. स्वयंपाकघरांतून गॅलरींत आणि गॅलरींतून स्वयंपाकघरांत उगीचच तीन चार वेळां येरझरा केल्या आणि त्याच विचलित मनः-स्थितींत घराबाहेर पडली.

दोरा तुटलेला पतंग अंतराळांत हेलकावत रहावा त्याप्रमाणं विचारविकारांच्या वावटळींत तिचं मन झुकांड्या खात होतं--नुसतं मनच नव्हे, तर शरीरसुद्धां !

आक्टोबरच्या कडक उन्हानं मुंबई कोळपून निघत होती, पण तब्बल दोन तास निरनिराळे रस्ते तुडवतांना तिला जणूं याची शुद्धहि नव्हती.

डी. सिल्वा रोडवरील फॅन्सी कापडाचीं दुकानं, रानडे रोडच्या फुटपाथवर बसलेल्या भाजीवाल्या बायका, थोडं पुढं चालून गिरगांवर

डावीकडे लागलेली फर्निचरचीं दुकानं......हीं सारीं दृश्य पाहतांना तिच्या मनाच्या नेणिकेंत खोल खोल दडून बसलेल्या प्रपंचविषयक अनेक सुखस्मृती चाळवल्या गेल्या आणि हर्षविषादाच्या संमिश्र संवेदनांनी तिचं अंतर भरून आलं. तिनं व मनोहरनं मिळून अनेक वेळां एकमेकांच्या पसंतीनं कापड खरेदी केलं होतं. भाजी विकत आणतांना दोघंहि स्वतःपेक्षां आपल्या प्रेमीकाच्याच आवडीच्या भाज्यांना आधीं स्थान देत. तिला नकळत मनोहर एखादे दिवशीं तिच्या पसंतीचा एखादा दागिना विकत घेऊन तिला चकित करी, तर त्याला नकळत तिनं फर्निचरच्या दुकानांतली एखादी सुबक वस्तु खरेदी केली म्हणजे तेंच आश्चर्य मनोहरच्या दृष्टींत प्रतीत होई...तशींच तीं कोपऱ्या-कोपऱ्यावर असलेलीं इराण्याचीं हॉटेलं—

पण गतकाळांत धांवू पाहणाऱ्या मनाला तिनं प्रयत्नानं आवरलं. विझून थंड झालेल्या भूतकाळाचा कोळसा उगाळीत बसल्यानं त्यांतून पुन्हां थोडंच तेज प्रकटणार होतं ?

ती झपाझप पावलं उचलूं लागली.

शिवाजीपार्ककडे जाण्यासाठीं गोखलेरोडच्या नाक्यावरून उजवीकडे वळली नाहीं तोंच समोरून लोअरपरळनिवासी येत असलेला तिच्या दृष्टीस पडला. पण त्याच्याकडे तिनं नेहमींप्रमाणं उपहासानं किंवा तिरस्कारानं पाहिलं नाहीं. उलट, चेहऱ्यावर प्रसन्नतेचं हंसूं आणल्यासारखं करून त्याचं क्षेमकुशल विचारलं, नुकत्याच छापून आलेल्या कवितेची स्तुति केली आणि त्याच्या प्रीतीचा अव्हेर केल्याबद्दल स्वतःला पश्चात्ताप वाटत असल्याचंहि सूचित केलं.

तिच्या प्रत्येक शब्दासरशी लोअरपरळनिवासीचे पाय आणि पृथ्वि यांच्यांतलं अंतर वाढत चाललं होतं. उष्णतेनं रस्यावरलं डांबर पघळत असल्याचं वास्तवता ओरडून सांगत होती, पण काव्यात्मतेनं पछाडलेल्या लोअरपरळनिवासीच्या मनाला उभ्या गोखलेरोडवर बकुळीच्या फुलांचा सडा

पडला असून सगळीकडे चांदणंच चांदणं पसरल्याचा भोंगळ साक्षात्कार होत होता ! 'भावनाप्रधान', 'संवेदनशील' इत्यादि विशेषणांची पाटी जन्मतःच डोक्यावर घेऊन जगांत पाऊल टाकलेल्या कवीश्वराच्या हृदयांत सुरंगाच्यां त्या भाषणानं अनेक नाजूक मनसुब्यांचा नुसता तोबा उडवून दिला होता ! पण त्यांची रस्त्यावर वाच्यता नको या विचारानंच कीं काय एकच गद्य मसलत त्याच्या तोंडून बाहेर पडली, 'समोरच्या 'जमदग्निविहारांत' पापड फारच छान मिळतात, जाऊं या का आपण ?'

सुरंगानं नाहीं म्हटलं नाहीं.

पापड खातां खातां लोअरपरळनिवासीनं, मराठी भाषा मरणाच्या पंथाला लागली आहे असं विधान केलं, त्याला तिनं आक्षेप घेतला नाहीं; भाषेच्या उद्धारासाठीं तरुणांनीं कंबरा कसल्या पाहिजेत हेंहि त्याचं मत तिनं खोडून काढलं नाहीं; किंवा उडदापेक्षां मुगाचे पापड खुसखुशीत लागतात या अभिप्रायाशींहि तिनं मतभेद दर्शविला नाहीं. एवढंच नव्हे तर बोलण्याच्या भरांत तिच्या पायाला किंवा खांद्याला मधून मधून होणाऱ्या त्याच्या स्पर्शाचें प्रमाण वाढत होतं, त्याबद्दलहि तिनं नकाराचा शब्द काढला नाहीं !

आणि ती सहा सव्वासहाच्या सुमाराला घरीं जायला निघाली ती अत्यंत उद्विग्न मनःस्थितींतच. कांहीं तरी हरवल्यासारखं वाटून मनाला चुटपूट लागावी तशी तिची स्थिति झाली होती. टिळकपुलाच्या तोंडाशीं येतांच टाळमृदंगांच्या आवाजानं ती दचकून भानावर आली. तिच्या शेजारून प्रेतयात्रा जात होती. प्रेतामागून जाणाऱ्या घोळक्यांतला एक इसम दुसऱ्याला सांगत होता, 'जलमभर जाळून खाल्लं नव्हं कां त्यानं तिला ! गेली बिचारी, सुटली ! तसं बगाया गेलं तर दुसरं घर उभं कराचला कोण आडवं येनार व्हतं तिच्या ? पन बापडी म्हणायची, कसाबी झाला तरी दादला व्हये माझा ! त्येनं गाय मारली म्हून आपुन वासरूं

मारायाला नगं ! त्यो आडवाटेला लागला असल तर त्येला सरळ नीट रस्ता दावायचं आपलं काम हाय. आपल्या बिगर त्येचं दुसरं कोन हाय या दुनियेंत...! '

प्रेतयात्रा जसजशी दूर जात होती तसतसे त्या इसमाचे शब्द अस्पष्ट होत गेले. पण सुरंगाच्या कानांत पुन:पुन्हां ते घुमूं लागले.

' आपल्याबिगर त्येचं कोन हाय या दुनियेंत ! ' खरंच, मनोहरला तरी आपल्यावांचून या अफाट जगांत दुसरं कोण आहे ? तो चुकत असला तर त्याला त्याची चूक समजावून सांगण्याऐवजीं त्याच्यावर चिडून जाऊन संतापाच्या भरांत भलत्याच मोहाला थारा देण्याचा वेडेपणा आपल्या हातून घडूं पाहत होता ! छे: ! छे: ! साध्या, अशिक्षित बाईला जें कळलं तें आपणासारख्या सुशिक्षित म्हणविणाऱ्या स्त्रीला समजलं नाहीं तर मग भाराभर पुस्तकांचं ओझं बाळगायचं कशाला जवळ !...... खरचं, झालं गेलं विसरून जाऊन सुखासमाधानानं रहायला मनोहर होईल का तयार ?—

कुंठित मनानंच ती घरीं गेली. मनोहर कुठंतरी बाहेर गेला असावा. टेबलावर त्यानं तिच्या नांवाचं पत्र लिहून ठेवलेलं आढळून आलं. तिनं थरथरत्या हातानं लिफाफा फोडून पत्र वाचावयास आरंभ केला—

' प्रिय सुरंगा—

' आपल्या आयुष्यांतील प्रीतीचा प्रकाश आतांशा कां लोपत चाललाय याचं उत्तर शोधायचा तूं मनाशीं कधीं प्रयत्न केलास का ? पुरुषाचं प्रेम जाऱ्याच चंचल स्वभावानं असल्यामुळं तें एका जागीं ठरत नाहीं या सनातन मताचा पुनरुच्चार करून तूं मोकळी होशील. पण सुरंगा, इतरांबद्दल मी बोलत नाहीं, तुझ्याइतकंच माझ्या अंत:करणांतलं इमान अजून शाबूत आहे, तें यत्किंचित्‌हि चळलं नाहीं याची मी तुला त्रिवार ग्वाही देतों !

मग आपल्या प्रीतीला सुरुंग लागण्याचं कारण काय ? सुरंगा, तूं मला सनातनीं म्हण, बुरसटलेल्या विचारांचा म्हण, पण मला आपल्या वैवाहिक असंतोषाचं मूळ आपल्या प्रौढ विवाहांत असल्याची खात्री पटली आहे. वधुवरांचीं वयं वाढलीं कीं त्यांच्या मतांनाहि एक प्रकारचा साठरपणा येतो अन् मग कांहीं तीं एकमेकाशीं एक जीव होऊं शकत नाहींत हें अनुभवानं पटत चाललंय मला ! पूर्वीच्या लग्नपद्धतींत अनेक दोष असतील, पण पतिपत्नीच्या मनाची मिळणी होण्याच्या दृष्टीनं ती पद्धत खचित यशस्वी ठरली आहे. शेंकडों जुने संसार या सत्याची साक्ष देतील ! असल्या सुखी दांपत्यांकडे पाहूनच हजारों कवींना प्रीतीवर काव्यं रचायची स्फूर्ति मिळत असावी.

त्या प्रेमाचं अमृत आपल्या वांट्याला आलं नाहीं हें आपलं दुर्दैव खरं; पण जगांत ज्याच्या वांट्याला अमृत येत नाहीं त्याच्या वांट्याला विष यावं असा तरी कुठं नियम आहे ?... आपण दोघांनींहि मनांत आणलं अन् समजुतदारपणानं यापुढं वागायचं ठरविलं तर माझी खात्री आहे सुरंगा, आपलं संसारांतलं दुरावत चाललेलं समाधान पुनः आपणांला परत आणतां येईल.

' सुरंगा, पटतील का तुला माझे हे विचार ? '

पत्राची घडी करतांना इतका वेळ खिन्न असलेली सुरंगा हंसली.

(हिंद–मासिकाच्या लघुकथाचढाओढींत यशस्वी ठरलेली लघुकथा)

प्रसिद्धि – हिंद मासिक ऑगस्ट १९४९

# तीन बहिणी आणि एक सुभाषित : १३

'माफ करा! आपणाला 'ॲक्शन' मुळींच नाहीं! नटीला 'ॲक्शन' पाहिजे. नुसतं सुंदर असून काय उपयोग ?'

'पण मी मोठ्या आशेनं घरदार सोडून इथपर्यंत आलें —या कलेंत नांवलैकिक कमावण्याच्या हेतूनं! कसंहि करा, पण माझी निराशा करूं नका. गांवीं तशीच परत गेलें तर लोक काय म्हणतील? घरचीं माणसं काय म्हणतील? नवरा, सासू, सासरा, जावा या साऱ्यांच्या इच्छेविरुद्ध सिनेमासृष्टींत पाऊल टाकण्याचा निर्णय घेऊन मी मुंबईला आलें, आतां परत पाठवूं नका मला.'

'हुंः! आमच्या धंद्यापेक्षां तुमच्या वैयक्तिक भावनांचा आम्ही विचार करीत बसलों तर दोन दिवसांतच कंपनीचं दिवाळं वाजेल ... अच्छा! नमस्ते!'

दिग्दर्शकाचं तें निश्चयी स्वरांतलं उत्तर ऐकून आपल्या डोळ्यांपुढें अंधारी येऊन हिरवे-निळे ठिपके तरळत असल्याचा वृंदेला भास झाला! घेरी आल्यामुळं सुटत चाललेला शरीराचा तोल सांवरण्यासाठीं ती खुर्चीचा हात घट्ट पकडून ठेवण्याचा यत्न करूं लागली...तोंच तिला जाग आली. गाडीनें सांधे बदलल्यामुळं आपला तोल गेला असल्याचं तिच्या लक्षांत आलं!

खिडकींतून स्टेशनाची पाटी दिसते का तें उगीचच पाहण्याचा यत्न करीत ती सांवरून बसली आणि तिनें दोन्ही हातांचे पंजे केसांवरून मागं नेले.

घटकेपूर्वी पडलेल्या त्या स्वप्नाचा अर्थ लावतांना तिचा विलक्षण गोंधळ उडाला! स्वप्नं हीं भविष्यसूचक असतात म्हणतात! मग आत्तांच्या स्वप्नांत कोणता अर्थ गर्भित आहे म्हणून समजायचा? सिनेमा–व्यवसायांत यश संपादन करायच्या ज्या ध्येयानं आपण संसारसुखाकडे पाठ फिरवून मुंबईला निघालों त्यांत अपयशच घ्यावं लागणार कीं काय?...पण मग सावळापूरला परत जाऊन पाहिल्यासारखंच कलाशून्य जीवन जगण्यांत आपणाला कितपत गोडी वाटेल?...मंदाताई गायनकलेच्या बळावर नांव अन् पैसा मिळवीत आहे, कुंदाअक्का कथा–कादंबऱ्या लिहून लोकप्रियतेचं शिखर गांठीत आहे, आपण मात्र चार भिंतींच्या गोठ्यांत...हो, गोठाच नाही तर काय? 'ज्याला कोणतीहि कला अवगत नाहीं असा मनुष्य साक्षात् पशु समजावा' अशा अर्थाचं सुभाषित प्रसिद्धच आहे, नाहीं का?...

पण दुसऱ्याच क्षणीं, स्वप्नावर विश्वास ठेवणाऱ्या स्वतःच्या भावड्या मनाचं वृंदेला हंसू आलं?

मनांत उसळलेल्या विचारांची गर्दी असह्य होऊन तिनं सहज खिडकीबाहेर वांकून पाहिलं.

वाजवीपेक्षां बराच वेळ त्या स्टेशनवर गाडी उभी असल्याचं तिच्या लक्षांत आलं.

'छेः! काय कमालीचं उकडतंय!...सुटणार तरी केव्हां ही गाडी इथून?' कुणीतरी त्रासिक आवाजांत पुटपुटला.

'पूर्वी कर्णाच्या रथाचं चाक भूमीनं गिळलं होतं,...तसं हल्लीं अग्निरथाची चाकं गिळायची तिला लहर आलीय् कीं काय नकळे!'

खांडेकरांच्या गोष्टी वाचून भाषणांत चमत्कृति आणण्याची संवय जडवून घेतलेल्या एका चष्मेवाल्या कॉलेज–तरुणानं उद्गार काढले.

'मिस्टर, ही निजामस्टेटची गाडी आहे म्हटलं! कसला कर्ण अन् कसला रथ घेऊन बसलांत? परदेशी मालावर पुकारलेल्या बहिष्काराच्या चळवळीपासून इकडल्या ड्रायव्हरांनीं अन् गार्डांनीं घड्याळ वापरण्याचं अजिबात सोडून दिलंय्! हॅः! हॅः! हॅः!'

मघांच्या तरुणावर ताण करणारा विनोद आपण निर्माण केला या कल्पनेनं त्या इसमानं सातमजली हास्य केलं आणि चार–सहा उतारूंनीं खो खो करून त्याला साथ दिली.

एन्. एस्. आर. गाडीचा वेग, आगपेटीचं मॉडल समोर ठेवून बांधण्यांत आलेले डबे, इत्यादि मुद्यांवरून एकेक उतारू अशा कांहीं रस-भरित गप्पा मारूं लागला कीं वृंदेला वाटलं, प्रतिभा ही ईश्वरदत्त देणगी असल्याचा साहित्यशास्त्रकारांचा दावा फुकट आहे!

वाजंत्रीवाल्यापासून तों फुटक्या कानावर जालीम दवा देणाऱ्या हकीमापर्यंत आणि सुगंधी एरंडेलाच्या कारखानदारापासून तों कुबट केशर गिऱ्हाइकाच्या गळीं उतरविणाऱ्या वाण्यापर्यंत साऱ्यांच्याच कल्पकतेला इथें बहर आला होता नुसता!

इतक्यांत पोर्टरनं घंटीवर दोन टोले देऊन हिरवा कंदील हलवला आणि गार्डानं फुर्रर्रदिशी शिट्टी वाजवतांच गाडी चालूं झाली. पाणी पिण्यासाठीं नळावर गेलेल्या एका उतारूनं धांवत धांवत येऊन डबा पकडला आणि गाडी सुटायला झालेल्या विलंबाचा खुलासा केलाः

कोणत्याशा जहागीरदाराच्याइथल्या लग्नालाठीं मुंबईची सुप्रसिद्ध नर्तिका राधाराणी आणि तिचे यजमान चित्रकार श्यामसुंदर आले होते, ते आज मुंबईला परत जात आहेत, त्यांचं सामानसुमान चढविण्यांत अन् हारतुरे घालण्यांत गाडी सुटायला उशीर झाला.

राधाराणीचं नांव ऐकतांच वृंदेन चमकून त्या मनुष्याकडे पाहिलं. त्या नांवाशीं निगडित असलेल्या तिच्या सुप्त मनांतल्या स्मृति चाळवल्या गेल्या ! कुठं बरं वाचलं होत आपण हें नांव ? कुठल्यातरी मासिकांत दोघां कलावंत पतिपत्नीचा फोटो अन् परिचय आला होता, नाहीं का ? त्यांच्या कांहीं कलाकृतींचे नमुनेहि छापले होते त्यांत. . .पाठीशीं मूल बांधून रणरण उन्हांतून फिरणाऱ्या भिकारणीचं तें चित्र... उत्कट जिवननिष्ठेचा अंत पाहणाऱ्या नियतीशीं झगडताना तिच्या दृष्टींत उमटलेल्या वात्सल्य, असहायता इत्यादि परस्परविरोधी भावना चित्रकाराच्या कौशल्याची किती चटकन् साक्ष पटवीत होत्या ! तसंच राधाराणींचं तें ' क्रांति ' नृत्य, भास्करराव तांब्यांच्या ' रुद्रास आवाहन ' या कवितेवर तें बसवलं होतं. मदांध सत्ताधीशांच्या टांचांखालीं रगडल्या गेलेल्या दलितांच्या अंतःकरणांत जो त्वेश, जो प्रक्षोभ उफाळून येतो त्याचा राधाराणीच्या प्रत्येक पदविन्यासांतून, अंगविक्षेपांतून, अन् नेत्रकटाक्षांतून धगधगीत आविष्कार होत असला पाहिजे असं त्या नृत्याचं छायाचित्र पाहतांना आपण मनाशीं म्हटलं होतं ... खरंच ! त्या कलावंतांच्या ओळखीचा लाभ आपणाला झाला तर स्वतःला भाग्यवान समजूं आपण !...

इतक्यांत, डब्याच्या दाराशीं उभा असलेला एक इसम आपणाकडे सारखी टक लावून पाहत असल्याचं तिच्या लक्षांत आलं. अंगावर मळकीं लक्तरं, दाढी बोट बोट वाढलेली, काळा रांकट चेहरा असं त्याचं ध्यान पाहून वृंदेच्या छातींत धडकीच भरली ! तिच्या मनांत एक चमत्कारिक शंका डोकावली तेव्हां तर तिचा भीतीनं थरकांपच उडाला. एकस्यादुकट्या देखण्या स्त्रीवर पाळत ठेवणाऱ्या मवाल्यांविषयींच्या अनेक बातम्या तिनं वर्तमानपत्रांतून वाचल्या होत्या !

पुढच्या स्टेशनाची ती उत्कंठेनं वाट पाहत होती. गाडी थांबतांच चटकन् दुसऱ्या डब्यांत निघून जायचा तिचा विचार होता.

इतक्यांत उतारू मंडळींत पिकलेल्या सातमजली हंशानं तिचं तिकडे लक्ष वेधलं गेलं.

राधाराणीवरून नृत्यकलेचा अन् नृत्यकलेवरून तमाशांत नाचणाऱ्या रंगी महारणीचा विषय निघाला होता. महार जातींत रंगीइतकी सुंदर बाई आपण कधीं पाहिली नव्हती अशी एका साठी उलटलेल्या भटजींनीं कबुली दिल्यामुळें साऱ्यांना हंसू आलं होतं. भटजींचे दोन्ही पाय तुंडे असलेले पाहून एकजण मिस्किलपणानं गालांतल्या गालांत हंसत म्हणाला, 'गांवखरीं न चरणाऱ्यांपैकीं प्रकरण दिसतंय हें!' दुसऱ्यानं भटजींना स्पष्टच शब्दांत विचारलं, 'आपल्या गांवांत आला होता वाटतं रंगीचा ताफा?'

'गांवाला म्हणजे काय? आमच्या घरींच पंधरा दिवस होती कीं ती!'

आतां तर सर्वांचं कुतूहल शिगेस पोंचलं आणि त्यांनीं म्हाताऱ्याच्या बोलण्याकडे कान लावले. भटजी सांगू लागले, 'तीन चार सालांपूर्वींची हकीकत आहे. एके दिवशीं दिवे लागणीच्या सुमाराला ही रंगी धापा टाकीत आमच्या घरीं आली. धांवण्याच्या श्रमामुळं तिच्या तोंडावाटे शब्दहि फुटत नव्हता. थोड्या वेळानं मोजक्या शब्दांत तिनं आपली हकीकत सांगितली. ती ऐकून अंगावर कांटाच आला माझ्या. रंगी बाळंतपणासाठीं माहेरीं गेली होती. पण तिथं रझाकारांचा उपद्रव असल्या-मुळं ती एका रात्रीं गुपचुपपणें आमच्या गांवीं आपल्या मावशीकडे आली. पण गुंडांना या गोष्टीचा सुगावा लागून ते तिथं आले. ऐन संध्याकाळीं तिला घरांतून पळविण्याचा त्यांचा मनसुबा होता. त्याच वेळीं रंगीच्या पोटांत प्रसूतीच्या कळा उठल्या होत्या.

'रंगीची जेमतेम येवढी हकीकत सांगून होते न होते तोंच दारावर जोरजोरानं थापा पडूं लागल्या. रंगीनं घरांत शिरतांना दाराला अडसर घालायची सावधगिरी घेतली होती....मी मागचा—पुढचा विचार न

करतां रंगीला एकदम लादणीत लपविलं. येवढ्यांत भिंतीवरून रझाकार वाड्यांत शिरले. त्यांतल्या एकानं माझी मानगूट पकडून माझ्या छातीवर संगीन रोखली अन् विचारलं, 'बोल, कुठं लपविलीस तूं तिला ?' मी माहीत नसल्याचं सांगतांच तिघांचौघांनी मला दोरानं करकचून बांधून टाकलं न् पाठीवर आसुडाचे फटकारे ओढूं लागले. प्राण गेला तरी रंगीला गुंडांच्या स्वाधीन करायचं नाहीं या निर्धारानं मी डोळे मिटले अन् मनांतल्या मनांत परमेश्वराचा धांवा केला. शुद्ध नाहींशी होईपर्यंत माझ्या अंगावर चाबकाचे वळ उठत होते....कांहीं वेळान मी सावध झालों तेव्हा गुंडांनीं माझे पाय कापले असून मला रक्ताच्या थारोळ्यांत टाकून पळ काढला होता असं मला आढळून आलं!...रंगीच्या कैमालाहि धक्का न लागतां ती लादणींत सुखरूपपणें बाळंत झाली होती....'

अंगावर शहारे आणणारा तो हृदयद्रावक प्रसंग ऐकतांना वृंदेच्या मनाला निराळाच विचार स्पर्शून गेला. प्राणाच्या मोलानं एका अबलेच्या अब्रूचं रक्षण करणाऱ्या माणूसकीचा केवढा हा भव्य आदर्श !...

कसलीहि कला अवगत नसलेल्या, पण भटजींप्रमाणं स्वतःच्या त्यागमय जीवनानं मनुष्यत्वाच्या कल्पनेला उजळा देणाऱ्या अनेक व्यक्तींचीं आयुष्यं तिच्या दृष्टीसमोरून झरझर सरकूं लागलीं.

स्वतःच्या अंध पत्नीची रात्रंदिवस काळजी घेऊन तिला सुखांत ठेवूं पाहणारा रामभाऊ मास्तर, निपुत्रिकपणाचं शल्य विसरून गोरगरीबांच्या मुलांना शिक्षणासाठीं पैसा पुरविणाऱ्या सावित्रीकाकू, पत्नीच्या अंगावरले दागिने मोडून मजुरांच्या दुःखांना वाचा फोडण्यासाठीं तोट्यांत वर्तमानपत्र चालविणारा शरद् कुळकर्णी या सर्वांच्या ठिकाणीं कोणती ललितकला वास करीत आहे ? पण त्यांच्या जीविताच्या कणाकणांतून माणुसकीचे पाझर झरत आहेत...तप्त, दग्ध जीवांना शितळाई देत आहेत...प्रपंचांतल्या कर्तव्याकडे पाठ फिरवून कलेच्या ध्यासानं तळमळणारे आपण मात्र माणुसकीपासून दूर दूर जात आहोंत...खरंच, थोरल्या

जाऊबाईंच्या बाळाला केवढा लळा लागला होता आपला! रात्रींसुद्धां तो आईला सोडून आपल्याच कुशींत झोपायचा! 'काकू काकू' म्हणून ध्यास घेतला असेल गुलामान आपला!...मामंजींना आपल्या हातचं थालीपीठ किती आवडायचं? ज्याच्या–त्याच्याजवळ आपल्या स्वयंपाकाची तारीफ करीत सुटायचे...बेबी, किशोर, मीना ही सारींजणं तर 'वहिनी केव्हां येणार रे श्रीकान्तदादा?' म्हणून सारखा त्यांचा पाठपुरावा करीत असतील!...गोठ्यांतल्या नंदिनीला अन् कालवडीलासुद्धां पाठीवरून आपला हात फिरला नाहीं म्हणून चुकल्याचुकल्यासारखं वाटलं असेल... अन् श्रीकान्त मनांत म्हणत असतील, 'किती वेडी आहे वृंदा! भाऊरावांचं पत्रसुद्धा न वाचतां ती रागारागानं निघून गेली! कुंदाताईंच्या गोष्टींच्या अन् कादंबऱ्यांच्या स्तुतीनं भाऊरावांचीं पत्रें भरलेलीं असतात म्हणून अलीकडे अलीकडे तीं वाचण्याचं वृंदा टाळूं लागली; पण बहिणीनं साहित्यप्रांतात मिळविलेल्या यशाचा तिला अभिमान वाटूं नये, हे नवल नाही का?...'

खरंच, भाऊरावांचं पत्र न वाचतांच आपण घराबाहेर पडलों. सख्ख्या बहिणीविषयीं इतकी मत्सरी वृत्ति शोभते का आपल्याला?...

इतक्यांत गाडीचा वेग कमी होत चालल्याचं तिच्या लक्षांत आलं. स्टेशन अद्याप बरंच दूर असतांना गाडी मध्येंच कां थांबत आहे हें पाहण्यासाठीं जो तो खिडकीबाहेर डोकावूं लागला. वृंदेनं खिडकीबाहेर वांकून पाहिलं, तेव्हा फर्स्टक्लासमधला एक तरुण उतारू आपल्या डब्यांत चढलेल्या एका आंधळ्या भिकाऱ्याला व त्याच्या बायकोला खालीं उतरण्यास भाग पाडीत असल्याचं तिला दिसून आलं. भिकाऱ्याची दया येऊन त्याच्या वतीनं बोलण्यासाठीं कांही उतारू त्या ठिकाणीं जमले; पण तो फर्स्टक्लासमधला उतारू त्यांचं म्हणणं ऐकेना. त्यांचं म्हणणं होतं, 'या भिकाऱ्यांनीं फार तर तिसऱ्या वर्गाच्या

प्रवाश्यांना छळावं, पण तिप्पट-चौपट भाडं भरून प्रवास करणाऱ्या मुशाफरांवर यांचा काय म्हणून जुलूम ? '

यावर उतारूंपैकीं एकजण कांहींतरी उत्तर देणार तोंच खिडकी-बाहेर तोंड काढून एक स्त्री म्हणाली, ' पुरे झाला मिस्टर आपला भूत-दयावाद ! एवढे उदार आहांत तर द्या दहापांचाची नोट काढून त्याला. नको कुणाची आहे ! हे असले कड घेणारे निघतात म्हणूनच या मेल्यांना दुसऱ्याचा सूड घ्यायला फावतं ! ' असं म्हणून त्या स्त्रीनं डब्याखालीं उतरलेल्या तरुणाला परत आंत येण्याची सूचना केली.

वृंदेचा स्वतःच्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. सुप्रसिद्ध चित्रकार श्यामसुंदर आणि त्यांची पत्नी राधाराणी हे कलावंतच का त्या बिचाऱ्या भिकाऱ्यावर तुटून पडत आहेत ?...

त्या घटनेमुळं तिच्या मनावर जी प्रतिक्रिया होऊं पाहत होती ती पूर्ण व्हायच्या आंतच तिचं मघाच्या निबरट चर्येच्या, दाढीवाल्या इस-माकडे लक्ष गेलं. तो अजूनहि तिच्याकडे टक लावून पाहत होता.

स्टेशनवर गाडी उभी राहतांच ती चटकन् बाकाखालची बॅग घेऊन खालीं उतरली आणि दुसऱ्या डब्यांत शिरली. पण काय आश्चर्य ! तो म्हातारा इसमहि तिच्या पाठोपाठच त्या डब्यांत शिरला. आतां मात्र वृंदेची भीतीनं गाळण उडाली. आस्तेआस्ते एकेक पाऊल टाकीत तो तिच्या रोखानं येऊं लागला तेव्हां तर तिच्या सर्वांगाला दरदरून घामच फुटला. इतक्यांत तो इसम तिच्या अगदीं जवळ येऊन चेहऱ्यावर हास्य आणीत म्हणाला, ' वळखलं न्हाई जनूं तुम्ही मला. ममईला तुमच्या थोरल्या ताईसाहेबांकडे कामाला न्हवतों का मी, तुम्ही आलता त्या वख्ताला ? तीन वर्सं ताईसाहेबांची इमानानं चाकरी बजावली त्येचं काय बक्षीस मिळालं हाये ठाऊक ? माय माउलीनं जेल दावला मला...'

' म्हणजे ? '

'व्हय, व्हय, जेल दावला. ताईसाहेबांवर हात टाकला असा माझ्या-वर कोडतानं आरोप शाबीत केला...व्हय, ताईसाहेबांचा म्यां हात धरला. अगदीं खरं. पन...पन वंगाळ हेतूनं न्हाई. इठ्ठलाच्यान् सांगतों...'

नंतर त्यानं जी हकीकत सांगितली ती ऐकून वृंदेच्या वृत्ति सुन्न झाल्या.

मंदाताईच्या हातांत प्रथमच दारूची बाटली पाहून हरबाच्या काळ-जांत चर्र झालं अन् त्यानं तिला भलत्याच व्यसनाच्या आहारीं न जाण्याचा उपदेश करून पाहिला. पण ताईनं त्याचं म्हणणं जुमानलं नाहीं. अखेर तिच्या हातांतून बाटली हिसकावून घ्यायचा त्यानं प्रयत्न केला. मंदानं जोरानं ओरडून शेजारी-पाजारी जमवले अन् त्याच्यावर भलताच आळ घेऊन त्याला पोलीसच्या स्वाधीन केलं.

कोर्टानं त्याला एक वर्षाची सक्त मजुरीची शिक्षा सुनावली.

पण एके दिवशीं पहारेकऱ्यांचा डोळा चुकवून तो तुरुंगाच्या भिंती-वरून पसार झाला. घराकडच्या आठवणीनं त्याला तुरुंगाबाहेर ओढून आणलं होतं. गेले सहा महिने तो लपूनछपून वावरत असतो. आठ-पंधरा दिवसांआड एखादी रात्र घरीं काढावी अन् उजाडायच्या आंत रानांत निघून जावं असा त्याचा कार्यक्रम चालू आहे...

वृंदेच्या डोक्यांत विचारांचं केवढं तरी काहूर उठलं...' मंदाताई, राधाराणी, श्यामसुंदर हे कलावंत खरे, पण तीं माणसं नव्हेत ! उलट रंगीची अब्रू वांचवण्यासाठीं प्राणाची तमा न बाळगणारे भटजी, धनी-णीला दारूचं व्यसन जडूं नये म्हणून तळमळणारा हरबा हींच खरीं माणसं म्हणतां येतील ! त्यांच्यांत कला नसली तरी त्याग होता, कर्तव्य-बुद्धि होती. माणुसकीची खोटी व्याख्या उराशीं कवटाळल्यानं केवढा प्रमाद घडणार होता आज आपल्या हातून !...'

वृंदेच्या अनुतापांत ग्रीष्माची दाहकता नव्हती. शिशिरांतल्या उन्हाचा कोंवळेपणा होता. तिच्या मनांतले विकल्पाचे ढग वितळून

जायला अन् अंतःकरणाचा कोंपरा न् कोंपरा ढवळून निघायला तो पुरेसा होता.

मुंबईला न जातां ती मनमाडहून गांवीं परतली.

तिनं न वाचलेलं भाऊरावांच पत्र अजूनहि श्रीकान्ताच्या टेबलावर पडलं होतं.

तिनं वाचायला आरंभ केला, '...आपली बायको लेखिका आहे याचा केवढा अभिमान वाटायचा मला ! पण लेखनांत व्यत्यय आणणाऱ्या छोट्या कुमुदवर अन् अरुणवर ती आतांशा चिडायला लागलेली पाहून तिच्या लेखनकलेची मला कींव येते ! पोटच्या गोळ्याची जिला कदर करतां येत नाहीं त्या लेखिकेनं पन्नास कादंबऱ्या अन् पांचशे गोष्टी लिहिल्या तरी तिला जीवनाचा अर्थ कळला नाहीं, कलेचं मर्म समजलं नाहीं असंच मी म्हणेन...'

पत्र वाचून संपल्यावर वृंदा कांचेच्या कपाटांतल्या कागदी फुलांकडे एकाग्रतेनं पाहत होती. चार टपोऱ्या गुलाबांचा गेंद होता तो.

श्यामसुंदर, राधाराणी, मंदा, अन् कुंदा यांच्या निर्जीव, अनुभूतिशून्य कलेचीं चार प्रतीकंच पाहत होती का ती ?

प्रसिद्धि—हंस, मार्च १९५०



## बालशंकर देशपांडे यांच्या पुस्तकांवरील
# अभिप्राय

**श्रावणांतल्या विजा** ( लघुकथासंग्रह )

" चमत्कृतिजन्य कल्पकता हाच भाषेपासून कथानकापर्यंत देशपांडे यांच्या सर्व लेखनाचा विशेष आहे. ही कल्पकता कधीं विनोदी वेष करून वावरते, कधीं काव्यकल्पनेचें तलम पातळ नेसतें आणि कधीं कधीं ती सुंदर सुभाषितांचा शृंगार करूनहि मिरवते. कथानकाच्या शेवटीं वाचकांना विस्मयाचा, दुःखाचा किंवा आनंदाचा धक्का देण्याचा त्यांचा पद्धतशीर प्रयत्न आहे. ओ. हेन्री हा त्यांचा आवडता लेखक असावा असें वाटतें. "

**--वि. स. खांडेकर**
प्रस्तावना, श्रावणांतल्या विजा.

**यमुनाजळीं** ( दुसरी आवृत्ति ) ( लघुकथा व लघुनिबंधसंग्रह )

" स्वतःविषयीं अपेक्षा उत्पन्न करावयास लावणाऱ्या अशा तरुण लेखकांत श्री. बालशंकर देशपांडे यांची गणना निःसंशय करावयास पाहिजे. श्री. देशपांडे यांच्या लिखाणाचा मुख्य विशेष म्हणजे त्यांचें लिखाण बिनबुडाचें नाहीं. त्यांस स्वतःचा असा विशिष्ट दृष्टिकोन व ध्येय-सृष्टि आहे. नव्या पिढीचें मार्गदर्शन करावयास ज्या मनोभूमिकेचे लेखक आज महाराष्ट्रांत आवश्यक आहेत तशी श्री. बालशंकर देशपांडे यांची भूमिका आहे. "

" नखशिखांत नटलेल्या एकाद्या अभिनयकुशल पण्यांगनेची कळा महाराष्ट्रांतील कित्येक लेखकांच्या लिखाणास आज आलेली आहे. त्यांत कुठें इमान नाहीं, बंधन नाहीं. पण ' तयार कपडे ', ' इंग्रजी झेंडू ', ' उमरखैयामचें अध्यात्म ', ' विषमज्वर ! छे नवज्वर ', ' मुक्तछंद ' इत्यादि देशपांड्यांच्या प्रस्तुत संग्रहांतील कथा व निबंध वाचल्यावर त्यांच्या लिखाणाची जात ' ती ' नव्हे अशी निश्चिती पटते. सहृदयता, निर्दोष विचार व प्रामाणिक तत्त्वनिष्ठा, इत्यादि गुणविशेष प्रस्तुत संग्रहांत जागोजाग उमटून दिसतात. कल्पना व सूक्ष्म निरीक्षण ह्यांची देणगी श्री. देशपांडे ह्यांस उत्तम मिळालेली आहे. उपरोधाचें व विनोदबुद्धीचें दुर्मिळ वैशिष्ट्य श्री. बालशंकर देशपांडे ह्यांस लाभलेलें आहे. त्यांवर त्यांनीं अवश्य भर द्यावा व त्या गुणांचा विकास करावा "

--आदेश ( नागपूर )
२७-७-१९४६

" श्री. देशपांडे यांच्या अंगीं कल्पकता आणि विनोदबुद्धि हे दोन गुण उत्कटत्वानें वसत असल्याचें आढळून येतें. त्यांतल्यात्यांत हा दुसरा गुणच त्यांच्या लेखनाकडे वाचकांचें लक्ष वेधून घेत असतो. या विनोदी वृत्तीचा उपयोग करून आपल्या लिहिण्यांत खेळकरपणा आणि प्रसन्नता निर्माण करण्याची हातोटी त्यांना चांगलीच साधली आहे. "

—समीक्षक
एप्रिल १९४६

" खांडेकरपद्धतीचें निवेदनकौशल्य आणि लालित्य यांमुळें हा संग्रह बराच वाचनीय झाला आहे. "

—किर्लोस्कर

" श्री. बाळशंकर देशपांडे यांच्या लेखनाचा मुख्य गुण म्हणजे कल्पकता. यांच्या कल्पकतेचा अनुभव या पुस्तकांतील कुठलंहि पान वाचकाला देईल....तत्त्वशोधनाची आवड व सुभाषितांची पेरणी हे आणखी दोन विशेष देशपांड्यांच्या वाङ्मयांत आढळतात. यमुनाजळीं ह्या कथा व निबंधांचा मिश्र संग्रह चुरचुरीत आहे. "

--विविध वृत्त

" श्री. देशपांडे यांनी लघुकथा रचण्याचीहि शैली साधली आहे. त्यांच्याजवळ विनोद आहे. कोणत्या टोंकापर्यंत कथानक नेऊन त्याला कलाटणी द्यावी ही गोष्ट ते जाणतात आणि त्यांतून सहजस्फूर्त बोध कसा सोडून द्यावा हें त्यांना अवगत आहे. "

—नवा काळ
२०-३-१९४६

" जुन्यांतहि आपल्या भाषेचा सुंदर साज चढवून आकर्षकपणा आणण्यांत श्री. देशपांडे यांचें वैशिष्ट्य आहे. निव्वळ बाह्य सौंदर्यांनीं मनाला भुलविणारी कलाप्रीति यांच्या ठिकाणीं दिसत नाहीं. तद मानवी अन्तःकरणांत विचारांचीं बीजें रुजवून अवाक् पण सूचक अशा नर्म लीलांनीं मानवजातीचें अभिष्ट साधणें हें श्री. देशपांडे यांच्या कलेचें नियत कार्य आहे. म्हणूनच प्रत्येक कथेंतून, प्रत्येक हितगुजांतून आणि प्रत्येक रूपकांतून हाच बोधाचा सूर पार्श्वसंगीताप्रमाणें सदैव ऐकूं येतो. ' यमुनाजळींच्या ' संथ प्रवाहांत लेखकाच्या तात्त्विक मनाचा आनंदी विलास भरपूर पहावयास सांपडेल. त्यांचा विनोद बहुधा बुद्धिगम्य आणि पुष्कळदां शाब्दिक असा आहे. पण त्याचा सर्वत्र संचार, लेखनाला एक गोड खेळकरपणा आणण्यास कारणीभूत झालेला आहे. "

--महाराष्ट्र ( नागपूर )
२४-३-१९४६

" श्री. देशपांडे यांच्या ठिकाणीं बुद्धिमत्ता, कल्पकता आणि विनोदबुद्धि चांगली आहे. सहजासहजीं कुठल्यातरी सामाजिक व्यंगावर किंवा मानवी मर्मावर उपरोधिक टोले मारणें त्यांना अवगत आहे. यामुळें त्यांच्या कथा नि लघुनिबंध चटकदार झाले आहेत. "

—**नवशक्ति**

" श्री. देशपांडे यांची लेखनशैली अतिशय चटकदार आहे. सुंदर कल्पना चमकदार सुभाषितें व खोंचक उपरोध यांचा उपयोग करण्यांत त्यांचा हातखंडा आहे. भाषेवरीहि त्यांचें उत्तम प्रभुत्व आहे. या गुणविशेषामुळें हें सारेंच पुस्तक वाचनीय उतरलें आहे. "

--**युगवाणी** ( यवतमाळ )

सप्टेंबर १९४७

" श्री. देशपांडे यांच्या भाषेचा प्रवाह मोहक, गंभीर, खेळकर, चमकदार अशीं निरनिराळीं वळणें घेत भावनांच्या प्रकारानुसार वाहत असलेला पाहून त्यांच्याविषयीं अपेक्षा बाळगावयास कांहीच हरकत नाहीं. "

--**वाङ्मयशोभा**

मे १९४६

## माझं जग— ( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

" माझं जग या कादंबरीची रचना नीटस असल्यानें ती एका बैठकींत वाचून होतें. "

—**विविध वृत्त**

४-५-१९४७

" कल्पकता व निवेदन कौशल्य हे या कादंबरीचे प्रमुख गुण होत व त्याला उपरोधपूर्ण विनोद, प्रसंगानुरूप सुभाषितें व भाषालालित्य; यांची जोड मिळाल्यामुळें कादंबरी वाचनीय झाली आहे. निसर्गाची सुंदर वर्णनें तर लेखकाच्या सूक्ष्म निरीक्षणाची व काव्यात्मवृत्तीची पूर्ण साक्ष देतात. "

**साहित्य**
मे १९४९

## शोभेचें सौभाग्य ( लघुकथा लघुनिबंध व टीका )

" श्री. देशपांडे यांच्या वाङ्मयाचा कल्पकता हा प्रशंसनीय गुण असून संयमशील शैलीनें त्यांचें वाङ्मय वाचनीय होतें. या संग्रहांतील गोष्टी चटकदार आहेत. लघुनिबंधांत श्री. देशपांडे यांच्या कल्पक प्रतिभेला विलोल नर्तन करण्यास अधिक अवसर मिळत असल्यानें त्यांचे लघुनिबंध खुसखुशीत व चटकदार वाटतात. पुस्तकांतील टीकात्मक लेख श्री. देशपांडे यांच्या ठिकाणची अभ्यासु रसिकता व्यक्त करतात. "

**विविध वृत्त**
२३–५–१९४८

## शिव्या आणि ओव्या ( लघुनिबंधसंग्रह )

" श्री. देशपांडे यांच्या लेखनाचा विशेष कल्पकता असल्यानें त्यांना लघुनिबंध विशेष सरसपणें लिहितां येतात. सखोल चिंतनशीलतेमुळें त्यांचे लघुनिबंध विचारी वाचकाला मोह घालतील."

**विविधवृत्त**
१९–६–१९४९

" श्री देशपांडे यांचें भाषेवरील प्रभुत्व वाखाणण्यासारखें असून त्यांची निरीक्षणशक्ति व कोटीपूर्ण भाषाशैली प्रभावी आहे. "

—दैनिक भारत
७–६–१९४९

" लघुनिबंध परिणामकारक रीतीनें लिहिण्याची कला श्री. देशपांडे यांनीं परिश्रमपूर्वक संपादन केली आहे. त्यांची भाषा प्रौढ असून त्यांना आपल्या लेखनांत गोड विनोदहि निर्माण करतां येतो...हें पुस्तक संग्रही ठेवण्यास आणि अभ्यासण्यास योग्य असेंच आहे. "

—अखंड भारत
२६–६–१९४९

" श्री. देशपांडे यांचें आकर्षक लेखनशैली हें वैशिष्ट्य होय व तें या पुस्तकांतहि प्रकर्षानें दिसून येतें. "

—सुषमा
सप्टें. १९४९

" असामान्य कल्पकता, रचनाचातुर्य, उपहास, उपरोधगर्भ विनोद, भाषेची प्रसन्नता आणि आंतरिक तळमळींतून निघालेला दुर्दम्य ध्येयवाद हे श्री. देशपांडे यांच्या साहित्याचे गुणविशेष होत. "

—हिंद
सप्टें. १९४९

# शुद्धिपत्र

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| २२ | ३ | नाहीं, तर | नाहींतर |
| २३ | १५ | अक्षरतत्त्वाचं | अक्षर तत्त्वानं |
| २५ | ४ | ह्रस्य | ह्रस्य |
| २७ | ३ | सत्त्याची | सत्याची |
| २७ | २१ | आहे. | आहे, |
| ३३ | २५ | असहाय्य | असहाय |
| ३५ | २ | अश्मयुग. | अश्मयुग, |
| ३९ | ५ | कंठशोस | कंठशोष |
| ३९ | ९ | १९४९ | १९५० |
| ४० | ३ | तुटपुंजा | तुटपुंज्या |
| ४१ | ४ | याचा | त्याचा |
| ४१ | १६ | पेंशनर | पेन्शनर |
| ४१ | २४ | जिवन | जीवन |
| ४२ | २५ | आनंदभुवनवनाचं | आनंदवनभुवनानं |
| ४३ | ९ | आर्ष– | आर्ष नि |
| ४३ | १९ | कोण म्हणेल ! | कोण म्हणेल ? |
| ४३ | २५ | मुक्तिचतुष्ट्याची | मुक्तिचतुष्टयाची |
| ४३ | २५ | शांत; रसात्मक | शांतरसात्मक |
| ४३ | २५ | आलंबन, विभाव | आलंबनविभाव |
| ४४ | ५ | तेजस्वी | तेजस्वी, |
| ४५ | १५ | विरहातलानं | विरहानलानं |
| ५१ | १८ | विद्वेष्याला | विद्वेषाला |
| ५३ | १४ | सांगितलं | सांगितलं, |
| ५३ | १८ | पंज्याखाली | पंजाखाली |

| पान | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ५६ | २२ | वाहण्यांत | वाहण्यांत |
| ५७ | ७ | मानी व | मानीव |
| ५७ | १५ | दिड्यांची | दिंड्यांची |
| ५८ | १९ | वर्णद्वेशाची | वर्णद्वेषाची |
| ५८ | २२ | असावा | असावा, |
| ५८ | २३ | मार्मिक | एका मार्मिक |
| ५९ | १ | झ्वाईग डॉस्टव्हस्की | झ्वाइग्, डॉस्टव्हस्की |
| ५९ | ४ | प्रभू्त्व | प्रभुत्व |
| ५९ | ७ | करणाच्या | करणाऱ्या |
| ५९ | १३ | युयुत्सु | युयुत्सु, |
| ६० | ८ | मुर्तिमंत | मूर्तिमंत |
| ६१ | १ | Crytic | Critic |
| ६१ | ६ | नतु | ननु |
| ६५ | ८ | पाहित्यानंच | पाहिल्यानंच |
| ६६ | ११ | यत्रचताम् | यत्नयताम् |
| ६[illegible] | ६ | मुर्खांकडून | मूर्खांकडून |
| ६९ | २२ | सोनेगांवची | सोनगांवची |
| ६९ | २५ | नवचैतस्य | नवचैतन्य |
| ७२ | २१ | जिवंत | जीवंत |
| ७७ | ६ | equality | is equality |
| ७९ | १६ | तिऱ्या | तिच्या |
| ८३ | २ | नेगिकेंत | नेगिवेंत |
| ८८ | १० | पाहिल्यासारखंच | पहिल्यासारखंच |
| ८९ | २२ | लग्नालाठीं | लग्नासाठीं |
| ९० | ७ | जिवननिष्ठा | जीवननिष्ठा |
| ९० | १२ | त्वेश | त्वेष |
| ९२ | २१ | मजुरांन्या | मजुरांच्या |
| ९६ | १ | ढवळून | धवळून |